— एकमेव विक्रेते —
कुलकर्णी ग्रंथागार
१८६ शनिवार, पुणें २

• • •

प्रकाशन ६३ वें.

• • •

— प्रकाशक —
पंडित अनंत कुलकर्णी
१८६, शनिवार, पुणें २.

• • •

— मुखपृष्ठ —
चित्रकार मुळगांवकर

• • •

— मुद्रक —
अमरेन्द्र लक्ष्मण गाडगीळ
मङ्गल साहित्य मुद्रणालय
आनन्दचेम्बर्स, आम्बराई, पुणें ४.

• • •

## कथानुक्रम



• • •

## आमचीं ललित प्रकाशनें

| | | |
|---|---|---|
| १ अमृतकण : | वि. वि. बोकील, बी. ए., बी. टी. | ३ |
| २ ठिगळ : | वि. वि. बोकील, बी. ए., बी. टी. | ४ |
| ३ विझती ज्योत : | शांता ज. शेळके, एम्. ए. | ५ |
| ४ चंद्रज्योति : | सौ मालती दाडेकर | २ |
| ५ भूकंप : | प्रो. गं. भा. निरंतर, एम्. ए. | २॥ |
| ६ मालकंस : | गोपीनाथ तळवलकर | ३॥ |
| ७ पहिलें चुंबन : | ग. ल. ठोकळ, बी. ए., बी. टी. | ३ |
| ८ त्रिवेंद्रमची सफर : | सौ. कमला फडके, एम्. ए. | ३ |
| ९ मला काय त्याचें ? | वि. दा. सावरकर | २। |
| १० स्वराज्याचा अरुणोदय : | आचार्य प्र. के. अत्रे | ३ |
| ११ भेळ : | य. गो. जोशी | २ |
| १२ झंझावात : | प्रो. ना. सी. फडके, एम्. ए. | ५ |
| १३ मंथन : | प्रो. ना. सी. फडके, एम्. ए. | ४ |
| १४ गुलमोहर : | शान्ता ज. शेळके, एम्. ए. | ३ |
| १५ सावरकरांच्या गोष्टी : | वि. दा. सावरकर | ४ |
| १६ पूर्वेचा वारा : | प्रा. लीला देशमुख | ५ |
| १७ कांटेरी मार्ग : | सौ. मालती दांडेकर | ५ |
| १८ रेशमाच्या गांठी : | दत्त रघुनाथ कवठेकर | ४ |
| १९ द्वादशी : | प्रो. चिं. वि. जोशी | २। |
| २० अपुरा डाव : | दत्त रघुनाथ कवठेकर | ४ |
| २१ लगीनघाई : | वि. वि. बोकील | १। |
| २२ झांकलीं माणकें : | न. अ. दांडेकर | १। |
| २३ चुकामूक : | दत्तू बांदेकर | २ |
| २४ गांठ-भेट : | वि. वि. बोकील | १। |
| २५ माझी भावगीतें : | बाबूराव गोखले | २ |
| २६ मायेची शाल : | वि. वि. बोकील | १॥ |
| २७ देणें देवाचें : | मनमोहन | ३ |
| २८ आशेचे किरण : | प्रो. वा. भा. पाठक | २॥ |
| २९ कमलपत्रें : | प्रो. ना. सी. फडके, एम्. ए. | ३ |
| ३० पद्मा : | गो. नी. दाण्डेकर | ३ |
| ३१ अभ्यंगस्नान : | ना. सी. फडके | ३ |
| ३२ फुलवाली : | वि. वा. शिरवाडकर | २ |
| ३३ मैफल : | ना. सी. फडके | ३ |
| ३४ माहेर : | अरविंद गोखले | ३ |

## माहेर : १

सकाळ सरत आली तशी घरांतली गर्दी, गडबड कमी कमी होऊं लागली. रमेशाची नि मधूची मारामारी संपली, दोघांनीं भरभर जेवून घेतलं व दप्तरं धुंडाळून शाळेचा रस्ता पकडला. कुंदाचें गाणें गुण-गुणणें व आरशांत लचकणे आटोपलें व तीहि सायकल काढून कॉलेजला गेली. दादांनीं जेवण उरकलें, कपडे केले व वहिनींनीं दिलेला विडा चघळीत ते कचेरीला गेले. जेवायच्या पंक्तींत शितें उडवून रांगत फिरणारा बाळ पाळण्यांत झोपी गेला. आजोबांचा विडा कुटण्याचा कार्यक्रम हलके हलके आटोपला. खलबत्त्याचा आवाज थांबला व घोरण्याचा आवाज-सुरू झाला. सईनें धुण्याचे पिळे घरांत ठेवले व खरकटीं भांडीं परसांत नेऊन ठेवून ती निघून गेली. मागल्या दारानें मांजर घरांत घुसलें व चुलीशीं बसून सुस्तावलें. पुढल्या माडींतला पोपट पेंढा भरल्यासारखा तटस्थ राहिला. अन् अखेर सर्व घरकाम आटोपलेलें पाहून वहिनींनीं पुढल्या दाराला कडी घातली, मागील दार लोटलें व माजघरांत चौघडीवर त्या आडव्या झाल्या.

मागलें दार कुरकुरत बंद झालें, तेव्हां परसांतली सायलीची वेल विलक्षण कष्टी झाली! एकाकीपणाच्या कल्पनेनें ती पाठीकडच्या भिंतीला अधिकच बिलगली अन् उन्हाच्या जाणीवेनें तिचीं हालणारीं पानें अधोमुख झालीं.

प्रखर सूर्याचें सैन्य सारें वाळवंट तुडवून नाहींसें होईपर्यंत हा ताप, हा एकाकीपणा, ही खिन्नता भोगावी लागणार होती. कुणाचा आवाज नाहीं, कुणाचा स्पर्श नाहीं, कुणाचें दर्शनहि नाहीं. उगाचच्या उगाच ताटकळत राहायची शिक्षा होती ही!—दुपार उलटल्यावर वहिनी दार उघडून चूल

भरायला बाहेर येतील, तेव्हां त्यांचा मुखचंद्रमा प्रथम दिसणार, त्यांची चूळ आपल्या पदरांत पडून शीण उतरणार! अन् मग सारी हालचाल, हंसणें खिदळणें! पण तोंवर हा छळ, ही कळ!

वेळ कधीं संपतो असें वेलीला झालें!—डाव्या अंगाला वर झेपावणारें उनाड टोंक उंचावून तिनें भिंतीपलीकडे पहायचा प्रयत्न केला. रस्त्यावरून आतां कुठें वाळलेला कडबा खाणाऱ्या म्हशी डुलत डुलत चालल्या होत्या. अजून रस्त्यावरची माणसांची रहदारी संपली नव्हती. वाळलेलें गळलेलें एखाद दुसरें पान वाऱ्यावर वाहात होतें! छे, अजून कितीतरी वेळ लोटायचा आहे!—दूरवर दिसणाऱ्या मनोऱ्यावरील तबकडींतील काट्यांकडे ते कोवळे कोंब कुतूहलानें कितीतरी वेळ पाहात राहिले!

मग बाजूची एक फांदी दाराच्या फटींतून आत निरखूं लागली. आत बराच काळोख होता. उजेडाच्या पट्टयांत मुंग्याची राग साखरेचे कण घेऊन धांवत होती. कोपऱ्यांत कुठेंतरी धान्याच्या डब्यांत उदीर खुडखुडत होता.

वेलीला भारी वाईट वाटलें. अन् खूप रागहि आला. चोरी! देवांनीं दोन दोन, चार चार, आठ आठ पाय दिले आहेत, वाटेल तिकडे वाटेल तेव्हा हिंडायला मुभा दिली आहे, म्हणून चोरी करायची? अन् धान्य नि साखर संपली तर उद्यां वहिनी काय करणार? मुले काय खाणार? रागाच्या भरांत फांदी घसरली व अधांतरीं लोंबूं लागली. गुलाबासारखे काटे किंवा पानवेलीसारख्या नख्या नाहीत म्हणून तिला हळहळ वाटत होती. अन् चुलीशीं तीक्ष्ण नख्यांचें उंदीर खाणारें माजर खुशाल पहुडलें होतें म्हणून तिला अधिकच संताप येत होता.

अखेर वेलीनें रागानें आपली किरकोळ यष्टि हालवली. वाळकीं पानें टपटपां पडलीं. आवाज झाला, सांवल्या हालल्या. पण मुंग्यांची रांग मोडेना व उंदराचें उंडारणें संपेना! खरकट्या भांड्यांवरचे उष्टें खाणारा बिचारा कावळा मात्र उडून गेला!

तेवढ्यांत सूर्य भर आकाशांत आला. त्याच्या किरणांच्या नजरा सहन न होऊन वेलीनें आपलीं सारीं पर्णछिद्रें घाईनें मिटून घेतलीं.

आतां वेलीला आपल्या स्वतःच्याच संसाराकडे लक्ष देणें भाग होतें

तिच्या अंगातला घाम पर्णछिद्रांवाटें बाहेर पडून वाफेसारखा नाहींसा होत होता. पर्णछिद्रें पुरीं बंद केल्यावर तिचे अवयव कोरडे झाले नि तिला बरें वाटले. सारीं दालनें बंद केल्यावर ती स्वतःच्या स्वैपाकघरांत डोकावूं लागली. लगेच कोठारांत हरितरंजक द्रव्याचे हिरवे हारेच्या हारे मंडईतून आणलेल्या भाजीसारखे पडले. शेगडया-शेगडयांवरून सांठवलेल्या साखरेचा पाक ढवळून निघाला. रोजची रसोई सुरू झाली. पिठूळ पक्वान्नाचीं ताटें भरूं लागलीं. पायापासून पाण्याच्या कावडी आणणें सुरू झालें. बाजूबाजूंनीं प्रायवायूची फोडणी दिली गेली. सारें रांधणे करता करतां वहिनींसारखी दमून गेली बिचारी !

तिला त्या ऐतखाऊ मांजराचा, चोरट्या मुंग्याचा, नि उष्टें खाणाऱ्या कावळ्याचा सुद्धां हेवा वाटला. वहिनींसारखा विसावा घ्यावासा वाटला. सारे जण विसावले होते, आडोशाला गेले होते. ही मात्र उन्हांत एकटी उभी होती.

तेवढ्यात तिला दूरवर खड्या असलेल्या सूर्यफुलाचें स्मरण झालें. तिनें सळसळून खुणावलें. पण बिचारें सूर्यफूल पाहूं शकत नव्हतें ! काय व्रत वांटयाला आलें होतें बेटयाच्या ! एकटें उन्हात उभें राहायचें. डोईवर घागर घेतल्यासारखें. अन् सूर्याची स्वारी हालेल तसें तोंड वेंगाडून पाहत राहायचें ! सूर्याला कधींहि दया येत नव्हती. त्याच्या धाकानें वाढींत बदल होत नव्हता नि फुलातहि वाढ होत नव्हती. अनेक बारक्या फुलांचें किडयांनीं भरलेलें नुसतें एक रंगीत तबक. नांवहि त्याचेंच. सूर्यफूल ! त्यापेक्षां आपलें किती छान नांव—वहिनींची वेल !

वहिनींची वेल आनंदली, डुलली. आपल्या भाग्यावर लोभावली. आपल्याला निदान ह्या भिंतीचा आधार आहे. अन् वहिनींचा आसरा आहे ! ह्या भिंतीवर आपण पसरतों, बागडतों. वाऱ्यावादळाला, ऊनपावसाला तितक्या भीत नाहीं. अन् वहिनी अन् त्यांचीं मुलें आपली किती काळजी घेतात, जपतात. घरांत गाय, कुत्रा, पोपट असावा तसेंच. त्याहून अधिक लाडक्या आपण !—सुखावलेली वेल भिंतीवर सुस्तावली. आसासून वहिनींच्या संसाराकडे पाहूं लागली.

वहिनींनीं संसारांत पुढील दारांनीं प्रवेश केला अन् ही वेल मागील दारानें आंत आली. विरंगुळा, माहेरची आठवण, फुलाची हौस म्हणून वहिनींनीं ही वाढवली. लालहिरव्या कोवळ्या कोंबांनीं वहिनींच्या मंगळा-गौरी जागून पूजल्या. वाढणाऱ्या पसरणाऱ्या वेलीबरोबर वहिनींचा संसार वाढला. वेलीचीं फुलें वहिनींच्या वेणीला व वहिनींच्या मुलांना खेळवूं लागलीं.

वहिनींच्या विरहानें वेलीला वेडयागत झालें ! एकाकीपणा असह्य झाला. घशाला कोरड पडली. सकाळीं आजोबा पूजेच्या ताम्हनांतलें पाणी टाकून गेले होते, त्यानंतर पाणी मिळाले नव्हतें. तिची तगमग झाली ! आपलें भुयारांत पसरलेलें लाबसर मूळ अधिक लांबवून तिनें दूरच्या विहिरीपासच्या दलदलीचा अंदाज घेतला. मुरमात किंचित् झिरपलेले पाणी बोटें चाखतात तसें चोखून घेतले.

तात्पुरती तहान भागली. अन् मग उसनें अवसान आणून उंचावलेल्या दोन कोवळ्या फाद्या भिंतीच्या एका दिशेनें नागमोड करीत वर सरूं लागल्या.

भिंतीच्या विटांवर शेवाळाची पोरें दबा धरून बसलीं होतीं व वेलीला गुदगुल्या करून घसरवत होती. एका फटीतून एक वडाचें रोपटें वर आले होतें. तशा अवघड जागी प्रचंड वटवृक्ष व्हायची त्याची वेडी महत्त्वाकांक्षा होती. ही भिंत वहिनींची आहे, वेलीची आहे, हें त्याना माहीत नव्हतें. एक दिवस आजोबा येतील, सारें शेवाळ खरवडून काढतील नि वडाचे पोरटें फेकून देतील !—वेलीला त्या उनाड मुलांची करुणा आली. धडपडत, धीर धरीत ती भिंतीच्या माथ्यावर आली व पलीकडे पाहूं लागली.

पलीकडच्या कुंपणापाशीं एक सरडा पुढें जात होता नि मागें सरकत होता. वेलीला आंतून धरलेलें. अन् सरड्याला बाहेरून अडवलेलें !—त्या पलीकडे मखमली हिरवळ अस्ताव्यस्त पसरली होती. एका बाजूला रस्ता पसरला होता अन् त्याच्या कडांनीं बारकीं रानझुडपें रोगट भिकाऱ्यासारखीं उभीं होतीं. दुसऱ्या बाजूला एका शेततुकडयावर कसलेंतरी पीक सैन्यासारखें खडें होतें. समोरच एक लहानसा जलाशय होता त्यांत छोट्या वनस्पति माशांसारख्या पोहत होत्या.

किती जाती, अन् किती गंमती!—रस्त्याच्या कडेनें उगवणारे हे जीव जगतात कसे, खातात काय?– कुणी तुडवत नाहीं, तोडून टाकत नाहीं!– अन् पाण्यांत अक्षयी कशा डुंबतात ह्या वनस्पति?– ह्यांचीं मुळें कुठे असतील?–पर्णछिद्रांतून पाणी जात नसेल का?–वाहून कशा जात नाहींत ह्या?– अन् हें ओळीनें उभें राहिलेलें आज्ञाधारक धान्याचें सैन्य! हुकमी खतपाणी व गोफणीनें राखण!–पण कोयत्यानें तंगड्या उडवायच्या नि बैलांनीं डोकीं तुडवायचीं! अन् वहिनींचा फुकटा दीर रोज येऊन जेवतो, तसा हा आंब्यावरचा बांडगुळ!

बाह्य जगाची भीति वाटून वेल वळली व वहिनींच्या घराकडे पाहूं लागली. आपण उंच दिसायला लागलों हें पाहून घरांतले सारे जण खूष होतील! किती कौतुक करतात आपलें! वेलीला गुदगुल्या झाल्या नि तिच्या खाद्यावरच्या दोन चार कळ्या उमलल्या.

तेवढ्यांत कुठेंसे लपून बसलेले दोन चार भुंगे झटकन् उमलल्या कळ्यांत घुसले. वेलीला तें आवडलें नाहीं. भलत्या वेळीं भलतेंच!–अन् खरें म्हणजे त्या दोन कळ्या उद्या आजोबांना पूजेला द्यायच्या होत्या. अन् बाजूच्या फुलाचा झुपका आज कुंदा खुडणार होती! किती लुब्रे नि आगंतुक असतात हे चोर!

तशा स्थितींत तिला हसूं आलें. कुठून कुठून आपल्या प्रियकराकडे पराग घेऊन हे दूत येतात अन् मोबदला म्हणून मध पिऊन जातात!–पण आपल्या कानीं हे कुजबुजले कीं, लोकांना वाटतें हिचे प्रियकरच आले. अन् मग पलीकडल्या घरांतला तो कुरळ्या केसांचा तरुण इसम कविता गुणगुणूं लागतो. ह्या माणसाना शंका, संशय, खोटे संबंध ह्याखेरीज सुचतच नाहीं!

प्रेमपत्रांप्रमाणें आलेल्या परागांनीं ती उन्मादांत गुंगून कांहीं काळ गप्प राहिली! पुन्हां बराच वेळ गेला. वेल भानावर आली. पर्णछिद्रें किलकिलीं करून पाहूं लागली. आणिक पाचोळा झालेलीं तीनचार पानें फेंकून देऊन ती तरारूं लागली. पण सारें शांत थंड होतें. हालचाल होत नव्हती. उन्हें आवरत नव्हतीं. एकाकीपणा संपत नव्हता! आतां अगदीं असह्य होत होतें

सारें !—वहिनींची झोपमोड व्हावी, असें आता वाटूं लागलें. आजोबाच्या खोकण्याच्या आवाज ऐकायला ती आतुर झाली. कुंदाच्या सायकलची घंटा वाजावी, मुलाची शाळा मधेंच सुटावी, सई भांडीं घासायला यावी...

पण काहीं होत नव्हते ! खरकट्या भांड्यावर एक कावळा मात्र उभा होता.

अन् एकाएकीं वेलीला विलक्षण गंमत वाटली. ह्या गाई नि म्हशी ओलें गवत, कोरडा कडबा तसाच चघळतात. हीं माणसं झाडाचा पाला नि कणसांचे दाणे शिजवून खातात. ह्या मुंग्या नि भुंगे दिसेल तें चोरतात. हे कावळे फक्त उष्टे फस्त करतात...अन् आपण ? आपण जमिनींत मुरलेलं मिसळलेलं पाणी शोषण करतों फक्त ! काय गंमत आहे ! आपणच फक्त चोरी करीत नाहीं !...

कुंदासारखीं पुस्तकें न वाचता, वहिनींसारखी पोथी न वाचता वेलीला केवढें कळलें होते !— पण हे सांगायची सोय नव्हती. कसं हालायचं, कसं बोलायचें ? जरा बोलायचा यत्न केला तर पानें फाटून जातील सारीं. अन् जरा हालायला पाहिले तर उन्मळून पडून मरून जाऊं !—अरेरे—

वेलीला वाईट वाटलें. पक्षी उडतात, जनावरें ओरडतात, माणसें तर वाटेल तें करतात !—अन् हे गव्हाचें सैन्य, ही रानझाडें, ही हिरवळ, ही वेल ! अबोल, अचल...आपली कुणालाच दया येत नाहीं. वहिनींना सुद्धा !—निदान जरा घरांत कां नाहीं आपल्याला ठेवली ?—

अन् मग रागारागानें ती उंबरठ्याआड असलेल्या तुळशीच्या तुऱ्यांचा मत्सर करूं लागली. हळदीकुंकू माखलेलं रोगट रोपटें तें ! केवढी मिजास नि केवढी आरास त्याची !—पूजा काय करतात, दिवे काय ओवाळतात—

तेवढ्यांत दाराच्या फटींतून मांजर अंग चोरून बाहेर आलें. पाठीची कमान करून त्यानें आळस दिला. अन् वेलीच्या माड्यांना नखें बोचकारून तें निघून गेलें.

वेलीचे अंग ओरबाडून निघालें. मांजराचा असा राग आला ! सुरेश असता तर त्यानें मांजराला नक्कीच पिटाळून लावलें असतें. तुळशीला ती टाकून बोलली त्याची अद्दल तर नाहीं ना घडली ?

शरमून शांत झालेली वेल कितीतरी वेळ उदास उभी होती. जखमेमुळें पोटात जरा डुचमळलें गेलें. नव्या कोंबाची वाढ जरा वेळ थांबली. पिष्ट पदार्थाची पाठवणी झाली. दोन मुळ्यांनीं आणिक पाणी पिऊन घेतलें. लेप लावून जखम जराशी बुजल्यावर सुटकेचा श्वास सुटला. भिंतीवर वाढणाऱ्या कोमल खांदीला हवा तसा वाक आला, विटेचा खडबडीत भाग तिनें पक्का वेढून घेतला. परागसिंचनाने प्रफुल्लित झालेल्या टपोऱ्या कळ्या गरोदर स्त्रीसारख्या डौलदार दिसूं लागल्या. टोकाटोकाचीं लहान मुलाच्या तळव्या-सारखीं दिसणारीं तांबूस पाने कढत वाऱ्यावर वाढूं लागलीं. अन् हिरव्या परकरात लपेटलेली एक कोवळी कळी पांढऱ्या साडींत प्रविष्ट झाली.

अन् हा सारा संभार साभाळणारी वेल वहिनींच्या संसाराकडे आसासून पाहात होती. त्या संसाराशीं, त्या माणसाशी ती विलक्षण समरस झाली होती. पण तें सारें जग शांत होते. नि हिला काहीं सुचत नव्हतें, करमत नव्हतें !...

रस्त्यावरून रमत जाणाऱ्या फेरीवाल्याकडे, हलके हलके फिरणाऱ्या मनोऱ्या-वरील काट्याकडे, अन् त्याहून सथ प्रवास करणाऱ्या सूर्याकडे, ती केविल-वाण्या नजरेनें पहात होती. कायमचें एका जागी जन्मभर उभें राहाणे एक वेळ परवडेल, पण उकाड्याने भरलेली ही भयाण दुपार दूर राहून दवडणें अशक्य होतें, असह्य होतें ! इतर वेळ एका जागीं उभें राहिलं, तरी निदान वहिनी दिसतात, कुंदा जवळ येते, सई...पण ह्या दुपारीं, दूर राहून...

एक एक आठवणींनी वेल व्याकुळ झाली. माहेरच्या आठवणींनीं वहिनी व्याकूळ होतात तशी ! वाटलें, वहिनी कधींमधीं अश्रू ढाळतात तशीं सारीं पानें ढाळून टाकावींत—

अन् मग काहीं काळ तिचा जीवनव्यापारच थांबला. मुळें शोषणक्रिया करेनात, अन्ननलिका तशाच थबकल्या. पानें निर्जीवपणें लोंबूं लागलीं नि हरितरंजक द्रव्य लोळागोळा होऊन पिवळें पडलें. वळणारी अंगलट झुकांड्या घेऊं लागली, कळ्या फिक्या दिसूं लागल्या, घोंघावणारे भुंगे न थांबतां निघून गेले.

जराशानें सूर्याची किरणें तिरपीं झाल्यावर तिला तरतरी आली. मुळां-तून पाणी घेऊन तिनें आंतून चुळा घेतल्या. फांद्या फडफडवल्या व पाकळ्या डमलवल्या. आतुरतेनें, आवेगानें ती लोटलेल्या दाराच्या फटीकडे पाहूं लागली.

बाळ जागा होऊन रडत होता. रडायचा तो थांबलाहि. वहिनीनें त्याला प्यायला घेतलें असणार! वेलीच्या टपोऱ्या प्रौढ कळ्या डोहाळे लागून डोलूं लागल्या.

दाराचें कवाड ढकलून वहिनी बाहेर आल्या. वाऱ्याच्या झोतानें वेल हलली, हंसली. तांब्यांतल्या पाण्यानें वहिनींनीं चूळ थुंकून वेलीच्या पुढ्यांत टाकली. वहिनींच्या चुळेत बाळाची लाळ व पतीचें पान मिसळलें होतें. वरवरचीं मुळें आतुरतेनें सरकलीं. जणूं फेकलेला प्रसाद झेलणारीं मुलें! आजोबाचा खोकण्याचा आवाज आला. वेलीजवळून ते एकवार हिंडूनहि गेले. जराशानें सई घाईनें आली. भांडीं घासून तिनें वेलीच्या वाटोळ्याशीं विसळून टाकलीं. मग कुंदाच्या सायकलची घंटा वाजली. मागोमाग तिची तान! बाजूचा कळ्यांचा गुच्छ झेप घेऊं लागला. सूर्य पुरता कलला होता. अन् रमेश नि मधूहि शाळेंतून परतले! आतां काय, वहिनींचा भरलेला संसार सुखानें सांडूं लागला! उघड्या मागीलदारातून मुलांची मारामारी, कुंदाचं लचकणें, आजोबांची शांत मूर्ति व वहिनीची लगबग पूर्णपणें दिसत होती. वेलीला धन्य धन्य वाटलें. तेवढ्यांत रमेश म्हणाला, "अरे बघ! वेल भिंतीवर चढली. चांगला मोठा मांडव घातला पाहिजे." मधू खुरपं घेऊन धांवला नि म्हणाला, "चल, आधीं आपण नीट आळं करूं!" मुलांना पाहून परत येणारें मांजर भिऊन पळालें. पुढल्या दारीं पोपटाशीं बडबडणारी कुंदा किलबिलत आली, तिनें चटदिशीं फुलांचा गोंडस गुच्छ खुडला नि आंबाड्यांत खोवला. वेलीला अगदीं लाज वाटली!—तिनें भरल्या मनानें पाहिलें तों मागीलदाराच्या उंबरठ्यावर उभं राहून भरल्या डोळ्यांनीं वहिनी तिच्याकडे पाहात होत्या!

• • •

## पुराचें पाणी : २

पुराचें प्रचंड पाणी. लाल लाल लोंढा. क्षितिज फोडून गर्जना करीत वाहत आलेला, वाटेल तशीं वळणें घेत तांडव करणारा, समुद्रासारखा अस्ताव्यस्त पसरत दृष्टीपार होणारा पाण्याचा अखंड प्रवाह. पाहिलं कीं डोळे फिरूं लागत. डोळे मिटले तर कानांत आवाज घुमत. कानहि बंद केले तर पुरांत वाहून चाललों आहों असा भास होई. आजूबाजूनीं असंख्य झाडं वाहून जात होतीं. दोन चार म्हशी, एक गाढव, कसलं तरी एक पोतं, अन् बराच केरकचरा वाहत नाहींसा होत होताच. तांबड्या लाटा हिंदकळत वेगानें जात होत्या. असंख्य भोंवरे भिरभिरत आडवेतिडवे सरकत होते. खोलीचा अंदाज करणं अशक्य होतंच, पण पुराचें पाणी वाढत आकाशापर्यंत चढणार कीं काय असा भास होत होता. तो छाती फोडणारा आवाज अन् प्राण वाहून नेणारा प्रवाह कधीच कमी होणार नाहीं असं वाटत होतं. मोकाट सुटलेले असंख्य उन्मत्त हत्ती, पाण्याचं रूप घेऊन पळत सुटलेले विक्राळ राक्षस, मृत्युदेवानें सोडलेली शेवटची संहारक शक्ति थैमान घालीत आहे असं वाटत होतं.

नदीच्या दोन्ही कांठांच्या चिंधड्या झाल्या होत्या. ते पाण्याच्या पोटांत गडपच झाले होते. व नवे कांठ थरथरत तयार होत होते. पावसाच्या झडीनें व पुराच्या लाटांनीं दोन्ही बाजूचे भूपट्टे भिजून थिजले होते. सर्वत्र चिखल झाला होता. हिरवळ अति ओली झाली होती. झाडं मुरगळलीं होतीं, मोडलीं होतीं. अगदीं आंत असलेलीं देवळें बुडालीं होतीं, घाटाची उंची कमी झाली होती. आकाशांत अंधार होता. पाऊस नव्हता, पण

रहदारीहि नव्हती. किनाऱ्याशीं जमणारे कोळी, परीट, गवळी, पार पळाले होते. आसमंतांत बेवारशी जनावरंहि वावरत नव्हतीं. दूरच्या इमारतींच्या खिडक्याहि बंद केलेल्या होत्या.

पाण्याचे पट्टे परत फिरवणाऱ्या घाटाच्या पायरीवर बबन्या उभा होता. भिजलेल्या केसांचीं झुलपें कपाळावर नाचत होतीं व पायजम्याचे पाय पोटऱ्यांपर्यंत गुंडाळून घेतले होते. कमरेवर हात ठेवून तोंडानें शीळ वाजवीत तो वाहत जाणारा एक सांगाडा गंमतीने पाहात होता.

सारा घाटच निसरडा झाला होता. पायऱ्यांवर शेवाळ सांठलें होतें. कांहीं दगड सुटलेसुद्धां होते. पण बबन्या बेदरकारपणें उभा होता. वेगानें आवाज करीत जाणाऱ्या प्रचंड लोंढ्याकडे पाहण्यांत त्याला अमाप आनंद होत होता. तें अफाट पाणी, त्याचा विलक्षण वेग, त्यांतलीं प्रेतें, भोंवरे, मासळ्या, बुडबुडे, काड्या—केवढी गहिरी गम्मत होती. आत उडी घेऊन सारी मौज लुटावी असं वाटे. मध्येंच तो एक पाय पुढें करी, मध्येंच वांकून हातानें पाणी उडवी, मध्येंच हातातल्या ठिकऱ्या प्रवाहांत भिरकावी......

घाटाच्या वरच्या टोकावर भावड्या उभा होता: भाबावून, भेदरून, कसाबसा. हुडहुडी भरल्याने त्यानें हाताची घडी घातली होती व धोतराचा गुडघ्यापर्यंत काचा मारला होता. छाती धडधडत होती नि डोळ्यांतून व्याकुलता साडत होती. समोरच्या पुराकडे पाहायचं तो टाळीत होता. मान वळवून ओढ लागल्यासारखा तो स्तब्ध असलेल्या वस्तीकडे पुन्हा पुन्हा पाहात होता. बबन्याला कसं आवरावं ह्या विचारानें तो अधिकच कासावीस होत होता.

भावड्या घराबाहेर पडणारच नव्हता. पहांटेपासून पाऊस कोसळत होता म्हणून शाळेला सुट्टी होती. सकाळचा वेळ अभ्यास करण्यांत अन् दुपारचा वेळ बोरूची बैलगाडी तयार करण्यांत त्यानें दवडला. केव्हां तरी पाऊस उघडला व किंचित् दिसायलाहि लागलें. दिवेलागणीला अवकाश होता नि सोमवारचा शंकराच्या दर्शनाला जायचा नेम साधण्याची शक्यता होती. भावड्या घरूब घाईनें बाहेर पडला. वाटेंतच पावसांत हुंदडून परतणारा बबन्या भेटला. बबन्याला आश्चर्य वाटलं, अन् भावड्याला आधार

वाटला. हातांत हात घालून दोघे नदीनजीकच्या शिवालयांत शिरले. भावड्या भाविकपणें शंकराची प्रार्थना करीत होता. तर बबन्या नंदीवर स्वार झाला होता. मग दोघेहि बाहेर आले. बाजूला घाट दिसतांच अवखळपणें उड्या घेत बबन्या पाण्यापर्यंत जाऊन पोचला. वरतीच थबकून भावड्या त्याला माघारी बोलावू लागला.

"बबन्या, बबन्या !–घरीं चल–"

"लेका, ही गंमत बघ."

वाहात आलेली काठी शिताफीनें उचलून बबन्या पाण्यावर प्रहार करूं लागला. उडालेलें पाणी त्याच्याच अंगावर शिंतडले, अन् तो मोठ्यानें हंसला. वर असलेल्या भावड्याचे शरीर पाण्याचे तुषार पाहून शहारलें अन् त्या हंसण्यानें त्याला रडू कोसळलें.

"भावड्या, लेका साप––" बबन्या डोळे चमकावीत म्हणाला. तो चक्क पुढें वाकला नि काठी लाब करीत वाहत जाणारें सापाचें वेटोळें पकडू लागला. साप पुढें गेला तशी बबन्याहि पायरीवरून धावत घाटाच्या टोकापर्यंत गेला. सापाचें वेटोळें अखेर काठीला लटकलें. भिरभिर फिरवीत त्यानें ते उंचावलें व भावड्याच्या दिशेनें भिरकावले.

भावड्या दचकून दूर झाला. पायरीवरून बबन्या पळूं लागला तेव्हांच त्याच्या पोटात भीतीचा पूर लोटला. बबन्या पडणार, पडला, असं त्याला वाटल. बबन्या उभा असलेला पाहूनहि त्याचं मन ठिकाणावर येईना. तो रडका स्वर काढून उद्‌गारला, "अरे, पडशील ! पुरे झाले तुझे खेळ––"

"तुला जायचं असलं तर जा रे––" बबन्या मागे न पाहताच म्हणाला. वाहत येणाऱ्या गाईचं फुगलेलं प्रेत त्याच्या होऱ्यांत होतं. तिकडे तो टक लावून पाहात होता. घरीं परतुन एका कोपऱ्यांत सारा वेळ स्वस्थ बसून काढणं केवढं कंटाळवाणं होत ! घरच्या लोकाचा डोळा चुकवून तो अखेर पसार झाला होता तो असा लगेच परतायला थोडाच ! पावसात भिजण्याची इतका वेळ मजा झाली; आतां पुराशीं उभं राहायची गंमत त्याला लुटायची होती. त्यापुढें त्याला घरदार, आईबाप, जेवणखाण, सारं तुच्छ होतं.

भावड्याला घरची विलक्षण ओढ लागली होती. आई काळजींत असेल, वडील रागावतील, धाकटा भाऊ बोरूची गाडी मोडेल. अंधार कसा वाढत होता, आजूबाजूला कुणी माणूस सुद्धां दिसत नव्हतं, अन् हा राक्षसी पूर...तो आवेगानें ओरडला, " आधीं चल ! नाहींतर मी तुझ्या वडिलांना सांगीन हं–"

बबन्या वळला व हंसून पाहूं लागला. काय नेभळट कारटं हें ! देव-दर्शन, घरकाम, अभ्यास नि शाळा ह्याखेरीज कांहीं सुचत नाहीं बेट्याला. गोट्या खेळतां येत नाहींत, झाडावर चढतां येत नाहीं, पोहतां येत नाहीं... भागुबाई !–बबन्याला एकदम चेव आला. भावड्याची भंबेरी उडवावी, त्याला भीतीनें भेडसावून टाकावें, असा विचार त्याच्या मनांत आला.

बबन्या म्हणाला, " पांचच मिनीटं !–शाळेच्या शर्यती आहेत परवा ना, त्याची जरा प्रॅक्टीस करतों नि मग जाऊं–" बबन्यानें हातातली ठिकरी पायरीवर ठेवली व लंगडी घालीत त्यानें सारी पायरी पालथी घातली. मग पायरीवर आडवं होऊन त्यानें जोर काढले, शीर्षासन केलं, अन् तसंच खाली डोकं करून हात टेकीत दोन पायऱ्या वर चढून परत उतरला. मग काठी पाण्यात मागें फेकून ती परत वाहत आली कीं उचलूं लागला. अखेर तर चक्क पाण्यांत उडी मारायचा आव आणून तो पायरीवर कोलांट्या मारूं लागला.

भावड्याला भोंवळ येऊं लागली. हा पूर बबन्याला व आपल्यालाहि गिळणार असं वाटूं लागलं. एकटंच पळून जावं असं वाटूं लागलं. काय नतद्रष्ट कारटा आहे हा ! अगदींच बेअकली. घरीं चांगलं जायचं सोडून आचरटासारखा भयंकर खेळ खेळतो आहे. चागली अद्दल घडली पाहिजे. बबन्या पडला तर बरं होईल इतकी चीड भावड्याच्या मनांत भरूं लागली.

" भावड्या, आतां हाय जंपू—"

" बबन्या, पुरे झाला मूर्खपणा—"

भावड्याचा संताप वाढेना. एकटं जाणंहि त्याला अवघड वाटलं. बबन्यावर रागावून काय उपयोग ? तो ऐकणार थोडंच ? अन् त्याला घेतल्याशिवाय कसं जायचं ? आपला बालमित्र, सवंगडी. उनाड असला

तरी जीवास जीव देणारा!—पण पुढें होऊन त्याला मागें खेचणं तर ह्या जन्मांतहि जमणारं नव्हतं.

व्याकूळ होऊन भावड्या म्हणाला, "तुझ्या पाया पडतों, पण चल बाबा परत! तुला बोरूची बैलगाडी देतों, गोष्टीचं नवं पुस्तक देतों, उद्याचीं गणितं सोडवून देतों. माझं नाहीं का ऐकणार बबन!—आपण दोस्त ना!—" आर्जवा करता करतां त्याला बबन्याबद्दल आपलेपणा वाटूं लागला. अन् अभिमानहि! केवढा धाडसी, साहसी आहे हा. ह्याला भय कसलं नाहींच!

भावड्याच्या विनवण्यामुळें बबन्याला अधिकाधिक हसूं फुटत होतें. "ही बघ भालाफेक. काठी म्हणजे भाला बरं का! आता लाब उडी मारूं का? पण नको तूं भिशील. त्यापेक्षा आपण दोघे तीन पायाची शर्यत खेळूं! ये—" तो वळून पाहूं लागला. भावड्याचा खेटरं मारल्यासारखा चेहरा पाहून त्याला गंमत वाटली. हा रडणार आता! नको, इतकी टिंगल नको! बबन्या गप्प झाला व कृष्णासारखा पाय वाकडा ठेवून अर्जुनाप्रमाणें स्तंभित झालेल्या भावड्याकडे पाहूं लागला. जाऊं दे, आपला मित्र आहे. आपल्याला भेळ देतो, गणितं सांगतो, आपली बाजू घेऊन घरचा मार चुकवितो! प्रेमळ, हुषार हवा हवासा वाटणारा—भावड्याची त्याला करुणा आली; नि कळवळासुद्धा.

एक पायरी पुढें होऊन भावड्या बोलूं लागला, "नको रे असं करूं!—चुकून पाय घसरला तर केवढा घात होईल. चल, घरीं चल, तिन्हीसाजचं असं भलत्या ठिकाणीं भटकूं नये. तुझी आई वाट पाहात असेल. कां तिला काळजींत टाकतोस? तुझ्या मोठया भावाच्या तुझ्यावर केवढया आशा आहेत. ये ना वर! घरीं जाऊन अंग कोरडं करून जेव नि झोप. उद्यां उन्हं पडतील. आपल्याला शाळेंत जातां येईल. खूप खेळतां येईल. पण उद्यां. आज आत्ता आपल्या घरीं आपल्या माणसांत चल—"

भावड्याचा घोगरा आवाज थाबवून बबन्या खणखणीतपणें म्हणाला, "पण खरं सांगायचं म्हणजे मला घरीं जायलाच आवडत नाहीं. काय कोंडून राहायचं सारा वेळ! जेवायचं, झोपायचं, अभ्यास करायचा,

आईचं ऐकायचं !–त्यापेक्षा असं एकटं, अंधारांत फार बरं !–ह्या पुराच्या पाण्यावर पडून संथपणें वाहत जायची तयारी आहे आपली–"

पण भावड्यानें असा कांहीं केविलवाणा चेहरा केला कीं बबन्या गप्प होऊन वर निघाला.

तेवढ्यांत पायाखालचा दगड हालला. बबन्यानें पाय दाबतांच दगड पुरा ढासळला अन् एकाएकी तोल जाऊन बबन्या पाण्यांत पडला. धप्प आवाज होऊन तो खालीं गेला अन् वर आला तो घाटापासून जरा दूरच ! धडपडत तो हात मारूं लागला. पण पाण्याचा प्रचंड लोंढा त्याला फुग्या-सारखा ढकलत नेऊं लागला. नाकातोंडांत पाणी शिरूं लागलें. धसक्याने निम्मी शक्ति नाहींशी झाली. जवळपास काहींच आधार नव्हता. पायऱ्या दूर राहिल्या. मघाचची बारकी काठी कुठें गेली. दूर भावड्या उभा होता. गुदमरत बबन्या त्याला हाका मारूं लागला, टाहो फोडूं लागला.

भावड्या भयंकर दचकला होता. बबन्या पुरात पडला ! पोहता येत असलं तरी वाहून जाणार, मरणार ! भावड्याचा जीव तीळतीळ तुटला. त्यानें मागें पाहिलें. घराघरांतले दिवे लागत होते. माणसांचे आवाज ऐकूं येत होते. माणसं, घर, आई, अभ्यास, उद्यां......भावड्याला सुचेनासें झालें.

" भावड्या, धांव, मला वांचव, मला धर–मी मेलों, मला वर येऊं दे, मला जगूं दे–भावड्या–भावड्या..." वेगानें वाहात जाणारा बबन्या ओरडत होता. त्याच्या डोळ्यांत गोळा झालेली आयुष्याची ओढ अधुक उजेडांतहि दिसत होती. पाण्याच्या माऱ्यानें तो हतबल होत होता.

मग पाण्यांत जेमतेम दिसणाऱ्या बबन्याचा आवाजहि बंद झाला. तेवढयांतहि बबन्यानें एक हात वर केला, तो वर केलेला हातच नुसता कितीतरी वेळ दिसत राहिला. भयंकर वेगानें वाहत जाणाऱ्या प्रचंड पुरां-तला वर उंचावलेला हात !–तो हात भोंवऱ्यांत सांपडला, गरगरत राहिला. अन् मग कांहींच दिसेना....

भावड्या घामानें निथळून निघाला. तो धप्प आवाज, ती पाण्यांतली तडफड, तो हृदय फाडणारा टाहो, तें वहात जाणारें शरीर, अन् मग

भोंवऱ्यांत फिरणारा उभा हात. अन् मग कांहींच नाहीं ! नुसता प्रवाह, अखंड प्रवाह ! भावड्याला सारें दृश्य पुन्हा पुन्हा दिसूं लागलें. नुसताच आक्रोश, नुसताच हात, नुसताच बबन, नुसताच भोंवरा...त्यानें अवसान आणायचा यत्न केला, हातपाय हालवायचें ठरवले, घरीं परतायचें ठरवलें. धांवत घरीं जायचे—आपल्या कीं बबन्याच्या ?—लोकाना बातमी सांगायची, प्रेत तरी शोधून काढायचं...नाहीं तर नुसतंच घरीं जाऊन ओळखच द्यायची नाही...कांही केलं तरी चार दिवसांनीं सारं सुरळीत होईल. मग आपला अभ्यास, शाळा, मोठं होणं, नोकरी करणं, संसार थाटणं, नाव कमावणं......

पण भावड्याचे पाय तसेच थबकलेले राहिले. अन् मनांतले विचारहि ओसरून गेले...कसं परतायचं ? एकट्यानं कसं जायचं, कुठल्या तोंडानीं बातमी सागायची, अगर कुठल्या मनानें छपवाछपवी करायची ?—आणि चार दिवसानीं तरी पूर्णपणें कसं विसरायचं ? हा बाळमित्र, त्याचा आक्रोश, त्याच्या डोळ्यांतला भयंकर भाव, त्याचं प्रेत, त्याचा उंचावलेला हात ! जन्मभर हें दृश्य आपल्याला दिसत राहणार ! हा आक्रोश कानात घुमणार, हा हात दृष्टीपुढे धरला जाणार. सुखात, दुःखात, एकान्तात, आवेशात हा क्षण ब्रह्मांड आठवायला लावणार ! हें ओझं घेऊन जन्म घालवावा लागणार ! कस मोकळ्या मनानें जगायचं ? कसं शात झोपायचं, पोटभर जेवायचं, मोकळं हंसायचं, झटून अभ्यास करायचा ? कसं परतायचं...

भावड्या अधातरीच, अजाणताच पुढें झाला. घाटाच्या पायऱ्या व पाण्याच्या लाटा एकमेकांत विलीन झाल्या. एक हात वर उंचावला गेला. बबन्याच्या मागोमाग, बबन्याच्या मार्गाकडे, भावड्या मुकाट जाऊं लागला...

● ● ●

## अनु : ३

खंडाळ्याला बिऱ्हाड केल्यापासून आल्या गेल्या ओळखीच्यांना स्टेशनवर भेटायला जायचं हा अनूचा एक महत्त्वाचा कार्यक्रम होऊन बसला होता. शाळा–कॉलेजचीं सारीं वर्षे पुणें, बडोदें, नागपूर अशा मोठ्या शहरीं गेल्यामुळें खंडाळ्यासारख्या केवळ वनश्रीनें व्यापलेला जागीं तिचें मन रमणं जरा कठीण होते. सिनेमा नि समाज ह्यापेक्षां नागरी जीवनाची अधिक धादल, धावपळ अनुभवायला तिच मन नेहमीच आतुर असे. अन् त्यामुळें जवळच्या नात्यातल्या माणसांपासून तों अगदीं मामुली परिचयाच्या व्यक्तीपर्यंत कुणीहि पुणें–मुंबई मार्गानें जाणारं येणारं असलें कीं अनु स्टेशनवर भेटायला जाई. सकाळीं अगर संध्याकाळीं सौंदर्यप्रसाधन करावं अन् रमत गमत गाडीच्या वेळेला फलाटावर यावं! अवकाश असला तर मासिकं विकत घ्यावीत अगर चाकोलेट चघळत बसावं. गाडी आली कीं फलाटाच्या दोन्ही टोकापर्यंत फेरी मारावी व ओळखीच्या व्यक्तीशीं थोडया वेळांत खूप बोलून घ्यावं! अन् मग रुमाल फडफडवीत असंख्य अनोळखी लोकांना हंसरा निरोप द्यावा! सिनेमा आणि समाज–ह्याहूनहि स्टेशन ही एक तिला आकर्षक अन् अगत्याची करमणूक होऊन बसली होती.

अन् आज तर तिची मैत्रीण काशी माहेरची रजा आटपून नागपूरहून पुण्यास परतणार होती!

काशी भेटणार म्हणून अनूची कोण गडबड उडाली होती. कॉलेजांत असतांना दोघींनीं मिळून आकाशी रंगाचीं इंदोरी लुगडीं घेतलीं होतीं, त्यांतलें नेसायला म्हणून तिनें पहांटेपासूनच काढून ठेवलें होतें. नुक्ताच

प्रेमविवाह झाला असूनही पतिराजाना ती पूर्णपणें विसरली होती; अन् नुकत्याच बोलूं लागलेल्या बेबीला केवढा वेळची मावशीच्या गोष्टी सांगत बसली होती. काशी देणार असलेलीं नागपुरी संत्रीं आणण्यासाठीं बाल्याला दुपारपासून बोलवून घेतले होतें अन् स्टेशनवर जाताना वाटेंत मेहेरोणीच्या दुकानातला टॉफीचा डबा काशीच्या मुलांसाठीं व्यायचा हें ती सारखे घोकत होती. काशीशीं काय बोलयाचे हें ठरलेलें व ठराविक होते—पण त्याच्या उजळणींतहि आनंद वाटत होता. बर्डीवरची ती म्हातारी वेडी अजून जिवंत आहे का, कुसुम गुप्तेच्या लग्नाचं काय झालं, घोष प्रोफेसरांना केस गळण्यावरचं औषध सापडलं की नाही, तेलखेडीवर आपण बसत होतो ती जागा अजून तशीच आहे का......

बेबीला बाल्याच्या खांद्यावर देऊन अन् हातात व्हॅनिटी बॅग घेऊन अनू स्टेशनवर आली तेव्हा गाडीला बराच अवकाश होता. ही आधीची अधीरी वेळही मोठी आनंददायक असते. फलाटाच्या टोकाला जाऊन दूरवरच्या सिग्नलकडे, बोगद्याकडे नि दिव्याकडे पाहायचें, गाडीच्या वेळेची टकल्या पारशी स्टेशनमास्तरकडे अन् खोकणाऱ्या म्हाताऱ्या पोर्टरकडे उगाचच चवकशी करायची, बाकावर बसायचं, उठायच, बाजूचीं रान-फुले खुडायची, फेकून द्यायची, हातातल्या घड्याळाकडे पाहायचें, स्टेशनच्या घड्याळाकडे पाहायचे, समोरच्या रुळाकडे पाहायचे— अन् आपण अधिरे नाहींत असाही अविर्भाव आणून कुठलेंतरी मासिक थंडपणे वाचण्याचा आव आणायचा ! मैत्रिणीची भेट होताच वाटणाऱ्या हर्षाइतकीच ही हुर-हूर हवीहवीशी वाटणारी होती.

फलाटावर अनूनें प्रसन्नपणे हा घोळ घातला, अन् मग दुरून डब्याची ओळ अवखळपणानें येतांच ती आवेगाने उठली. सुबकसं काळंभोर इंजिन, लालचुटुक पार्सलचे डबे, तिसऱ्या वर्गातल्या खिडक्याच्या चौकटींतून दिसणारीं खूपशीं डोकीं, जेवण्याच्या डब्यातून येणारा सिग्रेटचा धूर नि दारूचा वास, दारादाराशीं उभे असलेले तिकीट तपासणारे नि चहा—चिवडा विकणारे, अन् मग स्त्रियांचा डबा ! मलूल चेहऱ्यानें हंसणारी काशी बाहेर तोंड काढून हातरुमाल फडफडवीत होती...

ओघळणारा पदर, जड वाटणारी पर्स अन् नाचरेपणा करणारी बेबी यांना सावरीत अनू काशीच्या डब्याकडे धांवली. ‘ भेटलीस बाई एकदाची, म्हटलं येतेस कीं नाहीं स्टेशनवर, ए उतर ना इथं, चार दिवस रहा नि मग पुण्याला जा !–ये बेबी, लबाड आहे ग तुझी पोर…’ उतारू चढत उतरत होते. सामानाची फेकाफेक होत होती. प्रवाशांचा गलका वाढत होता. अन् जिवाभावाच्या दोन मैत्रिणी आपला आनंद अनेक शब्दांनीं अनेक रूपांनीं प्रकट करीत होत्या.

ह्यातच काहीं सेकंदे गेलीं. खूप वेळ गेला असं वाटलं, अन् गाडी लवकर सुटणार ह्याचाही खेद वाटूं लागला. एकमेकींचे हात पुन्हा पुन्हां दाबले गेले. अन् त्यानीं एकमेकींच्या पोराचे पापे घेऊन त्याना बेजार करून सोडलें. टॉफीची नि संत्र्यांची देवाण घेवाण झाली…

अन् तरीहि गाडी सुटायची वेळ झाली नव्हती !—

दोघीजणी नकळत अबोल झाल्या. लठ्ठ पोटाच्या एका पारशाची सामान उतरवण्याची धांदल पाहून दोघीही हंसल्या. त्यांच्या डब्याशीं घोटाळणाऱ्या एकदोन तरुणांकडे आठ्या घालून पाहिलें. बेबीचे कपाळावर येणारे केस दोनदां सारखे केले. अन् ह्यात फक्त दहापाच सेकंदें गेलीं.

मग अनु म्हणाली,

‘ कुडया नव्या केल्याच नाहींस वाटतं ?–’

कुडया कुरवाळीत काशी म्हणाली,

“ नाही बाई–”

पुन्हां किंचित् शातता. ती असह्य होऊन अनू उद्गारली,

“ आणिक सांग कीं ग नागपूरच्या गंमती. चांगली महिनाभर राहिली होतीस. पूर्वींच्या कुणी मुली भेटल्या नाहीत ? आपल्या वेळची मुलं तरी—?”

आठवायचा यत्न करीत काशी म्हणाली,

‘ नाहीं ग. आजारपणामुळें मला कुणाला भेटतांच आलं नाहीं. अन् मुलं ?—तो वाकनीस दुकान थाटून बसलाय स्टेशनरीचं. अन् तो वर्मा आतां प्रोफेसर झाला आहे. तो देशमुख—’

‘ देशमुख—! ’ दचकून अनु उद्‌गारली.

‘ तो यशवंत देशमुख ग !—तुला जसं आठवत नाहीं ?— तुझी नि त्याची तर विशेष दोस्ती होती.–’

अनूला चिमटा घेत काशी म्हणाली. अनूला चांगलाच चिमटा बसला. ती एकदम म्हणाली,

‘ हो-हो-तो !—त्याचं काय ? ’

‘ तो म्हणे एम. ए. चे पेपर टाकून उठून गेला. घोष प्रोफेसर अगदीं निराश झाले आहेत त्याच्या अशा वागण्यानं—’

अनु कांहीं बोलली नाही. काशीनें इतराच्या कांहीं हकीगती सांगितल्या त्या तिला ऐकूं आल्या नाहींत. तिनें सिग्नल पडलेला पाहिला, हिरवे दिवे दिसूं लागले. शिट्या वाजल्या, अन् काशीनें तिचा हात सोडला तेव्हा ती भानावर आली. काशीचा हात पुन्हा पकडून ती म्हणाली,

‘ आतां एकदा येना आमच्याकडे मिस्टरना घेऊन—’

दोघींनीं हंसून निरोप घेतला. गाडी हालली. डबे पुढें पळूं लागले. खिडकींतून डोकावणाऱ्या अनेक चेहेऱ्यातून काशीचा हंसरा चेहरा तिला बराच वेळ दिसत राहिला. मग गाडी दूर गेली, दिसेनाशी झाली. फलाटावर सामसूम झाली, शुकशुकाट झाला.

बाल्याजवळ गेलेली बेबी परत आईला बिलगत म्हणाली, ‘–आई चल ना !— गाडी गेली तरी उगीचच उभी राहिली आहेस.—’

अनु एकदम भानावर आली. आपण असे अवघडून उभे आहोंत ह्याचा तिला विस्मय वाटला. तिने गाडी गेली त्या दिशेकडे पाहिलें. छे—काशी गेली म्हणून खिन्न वाटत नव्हतें. परवां भावोजी गेले तेव्हां कसं चुकल्या-सारखं वाटलं. अन् आईला निरोप देतांना कसं रडूं आलं होतं. मग—मग—आज—

मग बेबीला आवेगानें जवळ घेत ती उल्हसितपणें म्हणाली,

‘ चल बबडे कोण उशीर झालाय् !–क्लबांतून येणंसुद्धां झालं असेल. घरीं गेल्यावर मावशीनं लाड कसे केले तें सारं सांगायचं हं–’

बेबीशीं उगीच लडिवाळ बडबड करीत ती स्टेशनाबाहेर आली. बाहेर चोहोकडे दिवे दिसत होते. अन् बाजूला डॉलीसेठची मोटार खडी होती. अनु अधिकच खूष झाली. डॉलीसेठनी तिला मोटारींत बोलावलें. खूप आनंदी मनानें ती गाडींत बसली अन् बंगल्याकडे परततांना बोलघेवड्या डॉलीसेठला मागें सारील अस तिचं बोलणं नि हासणं सुरू झालं—

× × × × × ×

त्यानंतर अनु अनेकदा स्टेशनावर निरोप द्यायला म्हणून गेली. तिची आई पुन्हा महिनाभर तिच्याकडे राहून परत गेली होती. भावोजी नि जाऊबाई अशाच येऊन गेल्या होत्या. मुबईहून पुण्यास जाताना तिच्या नवऱ्याचे मित्र तिला भेटत होते. अन् पुण्याहून मुंबईस धंद्यानिमित्त खेपा करणारा तिचा आतेभाऊ तर तिला कितीदा तरी भेटला होता. पण काशीच्या निरोपसमारभासारखा आनंद तिला कधींच वाटला नाहीं.

अन् पुन्हा आपली वार्षिक भेट संपवून काशी नागपूरहून पुण्यास परतली.

नागपूरहून निघण्यासंबंधीचं काशीचं पत्र आल्यापासून अनु अधीरी झाली होती. काशी केव्हा भेटेलसं तिला झालं होत. आता तिला दिवस गेले होते अन् तिचा स्वभाव चिरचिरा झाला होता. परतु काशी भेटणार हें कळल्यापासून पुन्हा तिच्या उल्हासाला उधाण आले होते. स्टेशनच्या रस्त्यापर्यन्त तरी फिरायला जा, हा नवऱ्याचा सल्ला आता ती मानूं लागली आणि काशीला भेटायला जाताना बेबीला लळतलोबत न्यायचं नाहीं हें तिनें ठरवून ठेवले. इंदोरी लुगडं पुन्हा बासनाबाहेर आलं. अन् करवद खायचे डोहाळे लागल्याने काशीच्या मुलालाहि करवंदांचा खाऊ न्यायचं निश्चित झालं. आरशापुढे उभं राहून काशीच्या भेटीची नक्कल होऊं लागली अन् कधीं नाहीं ती प्रसन्नपणे शीळ वाजवण्याची संवय तिला जडूं लागली.

अन् मग इंदोरी रास्ता नेसून अन् हातांत करवंदाचा पुडा घेऊन ती एकटीच काशीला भेटायला स्टेशनवर आली.

गाडीला बराचसा अवकाश होता. चालण्यानें अनु दमली होती तरीही तिला बांकावर बसून राहायचा कंटाळा आला. नेहमींप्रमाणें फुलं खुडायचा,

पोर्टरशीं गप्पा मारायचा, दूरचे सिग्नल पाहायचा चाळा तिनें केला. अधीरे-पणानें, हावरेपणाने...अन् तरीही गाडी येईना म्हणून तिचा चिरचिरा स्वभाव उसळून येऊ लागला.

अर्थात ठरल्या वेळेला गाडी आली. सुबकसें काळेभोर इंजिन, लाल-चुटूक पार्सलचे डबे, तिसऱ्या वर्गाच्या खिडक्यातून दिसणारीं खूपशी डोकी, जेवण्याच्या डब्यातून येणारा सिग्रेटचा धूर नि दारूचा वास, दारादाराशीं उभे असलेले तिकीट तपासणारे नि चहाचिवडा विकणारे. अन् मग स्त्रियाचा डबा !

दोघी मैत्रिणी जवळजवळ वर्षानें भेटत होत्या. पण बारा वर्षांनीं भेट-ल्यासारख्या वागत होत्या, बोलत होत्या.

अन् थोड्याच अवकाशात सारी उजळणी झाली. दागिने, लुगडीं, मुलंबाळ, यजमान, संसार—सार !— नागपुरात एकत्र दिवस काढले तेही आठवले गेले, अन् बरोबरीच्या मैत्रिणीची हजेरीही निघाली.

पण अनु एकदम थबकली. तिनें हंसणे आवरलें. अन् घड्याळाकडे पाहिलें. गाडी सुटायला सारे अर्धे मिनीट उरले होतें. गार्ड परत आपल्या डब्याकडे चालला होता. उतारू आपापल्या जागी जात होते. पुढचं इंजिन शिटी देत तयारीनें होत अन् मागचं इंजिन सुस्कारे टाकीत सोडवलं जात होतं. अनूची छाती धडधडूं लागली. काशीकडे वळून ती म्हणाली,

‘ अग तो वर्मा—तो प्रोफेसर झालाय् तो ! तो ह्यांना परवां मुंबईस भेटला होता. महाशिष्ट झालाय् अगदी !—अनु माझी शिष्या होती म्हणून सरळ थाप दिलीन् ह्याना—’

‘—नाहीं तरी तो तसाच होता. प्रोफेसरांना देखील तो स्वतःचे शिष्य मानायचा—’

काशीच कळकट बोलणं अनूला आवडलं नाहीं. तिनें अस्वस्थ हालचाल केली. आवंढा गिळला अन् विचारलें,

‘ आणिक आपल्या बरोबरच्या मुलांची काय खबर ग !—’

‘ कोण जाणे !—त्या वाकनीसच्या दुकानांत गेले होते—’

अनूनें अडवून म्हटलें,

'तो ठाउक आहे ढेरपोट्या ! आणीक दुसरं कुणी !'

'दुसरं कोण बरं—नाही आठवत !—'

काशीच्या उद्गारानें अनूचा चेहरा काळवंडला. तेवढयात काशी म्हणाली,

'तो देशमुख—यशवंत देशमुख—'

अनूचं हृदय केवढयानं तरी खालीं कोसळलें !—

'तो देशमुख नागपुरलाच असतो. पण अगदीं अबोल नि कष्टी दिसतो. परवां टेनिसच्या सामन्यात खेळला. पण पूर्वीची काहीं तडफ उतरली नाहीं त्याच्यात !—सारखा चुका करीत होता.—'

अनूला हलकेच अधातरीं उचलल्यागत वाटलें ! ती म्हणाली,

'बस गाडींत. सिग्नल पडला ! अन् आता माझ्याकडे राहायला आली नाहींस तर पुढच्या खेपेला गाडींतनं उतरवून घेईन.'

काशीचें उत्तर अनूला ऐकू आले नाहीं. एक ख्रिश्चन मुलगी केसाळ कुत्र्याला घेऊन घाईनें डब्यात चढली. तिच्या कपडयांचा सुगंध अन् तिच्या कुत्र्याच्या केसाचा मऊ स्पर्श ह्याने अनूचे मन सुखावून निघालें. हळूहळू काशी दिसेनाशी झाली तरी तिचे गोड शब्द स्पष्ट ऐकू येत राहिले. अन् फलाटावर सामसूम झाली तरी एकटं उभं राहण्यात आनंद वाटू लागला.

मग समाधानानें भरलेल्या हृदयामुळें अनूचे ओठ हलूं लागले. कसलंसं गाणं शिट्टीवर वाजवत ती फलाटाबाहेर पडू लागली. मगाशीं चिडकेपणानें तिने रानफुलाचा गुच्छ फेकून दिला होता, तो आतां मोठ्या प्रेमाने उचलून आंबाड्यात खोचला. बाहेर कुणाचीच गाडी उभी नव्हती. पण इतक्या लांब चालत जायची तिची तयारी होती. एकट्यानें रमत गमत चांदण्याकडे पाहून जाण्यात केवढा उन्माद असतो. रस्त्याने जाणाऱ्या एका कातकरणीला थांबवून अनूनें करवंदं विकत घेतली. अन् आधाशासारखं खात ती आनंदानें आपल्या घराकडे निघाली.

× × × × × ×

त्यानंतर अनू फारशी स्टेशनकडे फिरकली नाहीं. तिचे दिवस भरले आणि तिला पुन्हा मुलगी आली. बाळंतपणामुळें तिला घराबाहेर पडणें

अशक्य झालें होतें. संध्याकाळचा वेळ ती बंगल्यासमोरच्या बागेंत घालवीत असे. बारशासाठीं तिचीं माहेरचीं अनेकजणं येऊन गेलीं पण अनूला त्यांना निरोप देण्यासाठी स्टेशनपर्यंत जाण्याची संधी मिळाली नाहीं. मोकळं भटकायला, स्टेशनवर दिसणारं भरगच्च आयुष्य अनुभवायला, तिला हवं होतं—पण त्यासाठीं तिचं मन अडून बसलं होतं असंहि नाहीं.

अशा निष्क्रियतेंत अनेक महिने लोटले. अन् हळूहळू अनूचें मन दचकून जागें होऊं लागलें.

काशी नागपूरला ह्या वर्षासाठीं गेली कीं नाहीं तें तिला समजलें नव्हतें. ह्या वर्षी ती गेली नाही तर—? अनु अधिकाधिक अस्वस्थ झाली. काशीला घाईने पत्र लिहून तिनें तिचे बेत अजमावून घेतले. काशीचं नागपूरला जाण लाबलं हें समजल्यावर ती खूप खट्टू झाली. काशी नागपूरला निघाल्या-पासून ती परतेपर्यंतचे दिवस ती मोजू लागली. काशी कुठल्या तारखेला नागपूरहून निघणार ह्याची तिने पुन्हापुन्हा चवकशी केली. अन् काशी भेटणार त्या सोन्याच्या क्षणाची ती अनमोल उत्कंठतेनें वाट पाहूं लागली.

अनु आता घराबाहेर पडत असे. पण स्टेशनपर्यंत चालत जाण्याचें बळ तिच्यात नव्हते. डॉलीसेठची मोटार तिने बरेच दिवसापासून सागून ठेवली अन् डॉलीला रोज निरोप जात असे तो वेगळाच. इदोरी रास्ता रफू करायला झाला होता, तरी पण त्या दिवशी तो वापरायचा हें ठरलेलें होतें. बेबीला अन् बाळीला दोघानाही घरीं ठेवून ती जाणार होती. काशीला बंगल्यामागच्या तळ्यातलीं लाल कमळे भेट म्हणून नेणार होती.

अखेर दिवस मोजणे संपूं लागले तशी हृदयांतली धडधड वाढूं लागली. अन् हृदयातली धडधड कमी व्हायच्या आतच ती स्टेशनवर आली.

मोटार असून सुद्धा अनु खूप लवकर आली होती. स्टेशनचं आवार दिसताच तिला झपूर्झा घातल्यासारखे वाटलें. पोर्टरशीं तिनें गप्पा मारल्या, पण त्यांत तिचं आनंदी मन फारसें रमलें नाहीं. हातांत कमळाचा गुच्छ असल्यानें रानफुलांच्या बहराकडे तिनें दुरूनच पाहिलें. बाजूच्या बाकावर बसण्यापेक्षां फलाटावर नाचावें असे तिला वाटूं लागलें.

अन् मग गाडी आली. सुबकसे काळेभोर इंजिन, लाल—चुटुक पार्सलचे डबे, तिसऱ्या वर्गाच्या खिडक्यातून दिसणारीं खूपशी डोकीं, जेवणघरातून येणारा सिग्रेटचा धूर नि दारूचा वास, दारादाराशीं उभे असलेले तिकीट तपासणारे अन् चहाचिवडा विकणारे, अन् मग स्त्रियाचा डबा !—

काशीला खालीं उतरवून तिला अनूनें आलिंगनच दिलें.

कमळाच्या पाकळ्या गालांवरून फिरवीत काशी म्हणाली,

'बाळीला दाखवायला कां नाहीं आणलास ?—अन् किती सुटली आहेस गऽ !—मिस्टरना बढती मिळाली म्हणे तुझ्या. प्रेमाबरोबर पैसाही वाहतोय तुझ्या संसारात !—'

काशीच्या किलकिलाटाकडे अनूचें फारसें लक्ष नव्हतें. पांच सहा लठ्ठ गुजराथी बायका डब्यातून उतरून तिच्या पुढ्यातच उभ्या होत्या, त्याचीहि तिला अडगळ वाटूं लागली. काशीला बाजूला काढीत ती उत्साहानें म्हणाली.

'नागपूरला दीड महिना राहिलीस—तिकडची हकीगत आधीं सांग !—आपली ती बर्डीवरची वेडी—अन् कुसूम गुप्ते—अन् घोष—अन् मुख्य राहिलंच !— आधीं सांग त्या यशवंत देशमुखचं कसं आहे ?—तो देशमुख ग—'

अनूचं हृदय वर खालीं होत होतं, धडधडत होतं. तिचा आवाज घोगरा झाला होता नि शब्द तुटके येत होते. काशीचे दोन्ही दंड धरून ती विचारीत होती...अन् तिच्या नेत्रांत हवी असलेली हकीगत ऐकण्याची उत्सुकता गोळा झाली होती.

काशीनें पटकन् सांगावं म्हणून ती पुन्हां म्हणाली,

'तो यशवंत देशमुख गऽ !—तो अबोल अन्—'

काशी म्हणाली,

'आला लक्षांत !—अग तो आतां खूप छान झालाय्. ती घाटे डॉक्टरांची सुंदर मुलगी होती ना ?—ती शरयू ग—तिच्याबरोबर मोटारींतून भटकत असतो. खूप खुशींत आहे स्वारी. शरयूशीं लग्न झाल्यावर दोघं अमेरिकेला जाणार आहेत म्हणे !—'

अनूचे डोळे एकाएकीं मिटले गेले. काशीच्या खांद्यावर ठेविलेले हात नकळत खालीं आले. अन् तिची सारी काया किती तरी वेळ थरथरत राहिली.

किती तरी वेळ गाडी उभी होती. लोकांचा गलका वाढत होता. सामानाचे खच पडत होते. काशीचं हसणं संपत नव्हतं.

अनु कशीबशी, केव्हांची तरी उभी होती !

मग जणूं बंद पडलेलीं घड्याळे सुरू झालीं, मोडलेलं इंजीन नीट झालं, अन् विझलेल्या दिव्यांनीं हिरवा प्रकाश दाखवतांच गाडी धावूं लागली.

फलाटावर सामसूम झाली तेव्हां अनूच्या ध्यानांत आलं कीं काशीला आग्रहानें उतरवून घ्यायचं राहिलं ! तिला रुमालही फडकवला नाहीं आपण !—आपण नुसते उभें होतों.

नुसते !—अनूला अगदीं अधांतरीं, पोकळ वाटूं लागलें. काहींतरी संपलं, सुन्न झालं ! काहीतरी हरवलं, हुसकावलं ! तिला अंधाराची भीति वाटली. दिव्यांचा प्रकाशही असह्य झाला. बाहेर मोटर इषारा देत होती पण तिला चालवेना. बाजूच्या बाकावर ती बसली अन् डोळ्यात जमणाऱ्या अश्रूंना तिनें वाट करून दिली.



## पुतळे : ४

शिल्पकार चंद्रशेखर यांच्या स्टूडिओंत देवराम आला तेव्हां रात्रीचे दहा वाजून गेले होते. दिवसभराच्या दगदगीनं त्याचें अंग अगदीं आंबून गेले होतें; अन् केव्हा एकदां जमिनीला पाठ लागते असें त्याला झालें होतें. पहांटे केव्हां चाराला उठला होता तो !—अन् स्नान आटोपून बैलगाडीनें चार कोस मजल मारून मापट्याहून मुंबई–पुण्याच्या रस्त्यावर आला होता. खूप वाट पाहिल्यावर अन् खूप विनवण्या केल्यावर त्याला मुंबईची मोटर मिळाली होती. धुळींतला अन् धुरातला प्रवास; अन् मग मुंबईची घेरी येणारी वर्दळ. कुठून ह्या भानगडींत पडलों असे देवरामला झालें. पण नात्याच्या अशा उरलेल्या दूरच्या बहिणीच्या लग्नाला जाणें अवश्य होते. खेरीज गेल्या सातआठ वर्षांत मापटे सोडून तो शेजारच्या गांवढ्यांतसुद्धा गेला नव्हता. मुंबईत दोन दिवस राहून लग्नहि साधतां येईल अन् शांत थंड आयुष्यात थोडं वैचित्र्यहि आणता येईल, ह्या विचारानें तो निघाला होता.

पण ह्या प्रवासानें त्याचा उत्साह उतरून गेला अन् मग तो लग्नसमारंभ. कांदेवाडींतील चाळींतल्या दोन लहानशा खोल्यांत सारा सोहळा उरकला गेला. नुसती भातुकलीच. तिथेंच देवदेव, तिथेच गौरीहर, तिथेंच बोहलें, पानसुपारी, जेवायच्या पंगती. त्या गिचमिडीनें देवरामाचा अगदीं विरस झाला अन् तेथल्या गडबडीनें त्याचें डोकें उठलें. सगळीच घाई अन् सगळाच गोंधळ. लग्न लावायची घाई, पानसुपारीची घाई, जेवायची घाई, अन् पुन्हां घाईत जेवण, घाईत आंवराआंवरी, घाईत निरोप देणें ! सगळे

नुसते धांवत होते, धांपा टाकीत होते. अशी लगीनघाई, अन् असें आयुष्यांतलें वैचित्र्य देवरामला मुळीच मानवलें नाही.

लग्नाला आलेला बाळमित्र किसन भेटला अन् देवरामला मनस्वी आनंद झाला. मापट्याला गणपतीच्या मूर्ति करणारा किसन आता मुंबईत स्थायिक झाला होता. एका शिल्पकाराकडे कामाला होता. संध्याकाळीं वरात वगैरे आटोपल्यावर तो किसनकडे निघाला. थोडयाशा गप्पा मारतां येतील; अन् मुख्य म्हणजे शांतपणें ऐसपैस झोप ताणता येईल ! शोधत शोधत तो शिल्पकार चंद्रशेखराच्या दादरच्या स्टूडियोत गेला तेव्हा रात्रीचे दहा वाजून गेले होते.

चंद्रशेखरांच्या बंगल्यांतली मंडळी झोंपली होती. अन् लगत असलेल्या लहानशा स्टूडियोंत बारक्या दिव्याच्या प्रकाशांत देवराम अन् किसन गप्पा मारीत बसले होते. दिवसभरच्या दंगलीने देवराम अगदीं दमला होता. अन् मुंबईतल्या आयुष्यानें किसन बराच बदलला होता. त्यामुळें गप्पा रंगेनात. एकादी दुसरी आठवण, एकाद दुसरा प्रश्न, अन् मग दोघेहि जाभया देत शून्यपणें बसून राहात. जाग्रण नको झालें होते; अन् झोपणेहि अवघड वाटत होतें.

अखेर किसन म्हणाला, “ हात्तिच्या ! एवढा आला आहेस स्टूडिओंत, अन् इथलीं कामं न बघता तसाच बसला आहेस ! ”

आजूबाजूला माडलेले, अर्धवट अंधारात दिसणारे पुतळे पाहात देवराम म्हणाला, “ ह्याच मूर्ति ना—”

“ मूर्ति ? अरे देवांपेक्षा पाहण्यालायक माणसं ! आमच्या मालकाचं कसब तर बघ ! दुरून दुरून बडेबडे लोक पाहायला येतात; अन् स्वतःच खिळून राहातात पुतळ्यासारखे !—”

बोलता बोलता किसननें स्टूडियोंतले सारे दिवे लावले. साऱ्या हॉलभर एकच झगझगाट झाला. त्या उजेडानें दिपून देवरामने डोळे मिटून घेतले.

क्षणभरानें देवरामनें डोळे उघडले अन् आजूबाजूच्या एक एक कलाकृति पाहतांच तो आश्चर्यानें भारावून गेला. इतका वेळ अंधारांत ठोकळ्या-सारखे, सांगाडयासारखे दिसणारे ते पुतळे आतां स्पष्ट दिसूं लागले, नजर

ओढून घेऊं लागले. देवराम नकळत उभा राहिला आणि न बोलता सभोंवार पाहूं लागला.

त्याची नजर बाजूच्या कोपऱ्यांत उंच घडवंचीवर उभ्या केलेल्या तरुण स्त्रीच्या नग्न मूर्तीकडे गेली. केवढ सुंदर शरीर! अप्रतिम लावण्य! तिच्या...पण लाजून देवरामनें आपले डोळे काढून घेतले. अन् तो बाजूलाच असलेल्या म्हाताऱ्याच्या पुतळ्याकडे पाहूं लागला. अनेक उन्हाळ्यांच्या उमटलेल्या कपाळावरील रेषा, आयुष्यातल्या अनुभवानें खोल गेलेले डोळे, नाकावर गळलेली आरशी, पोक आलेले शरीर, हातांचा जीर्णपणा. जणूं म्हाताराबुवा म्हणत होते...देवरामने म्हाताऱ्यावरून पलीकडच्या संथ रवंथ करणाऱ्या गाईच्या पुतळ्याकडे पाहिलें, अन् मग तो परत त्या स्त्रीच्या आकृतीकडे पाहूं लागला.

हळुहळू त्याला विवस्त्र स्त्रीपेक्षा दुसऱ्या बाजूला उभी असलेली लुगडं नेसलेली पुरध्री अधिक आकर्षक वाटली. लुगड्याच्या चुण्या किती सुंदर कोरल्या होत्या. किती डौलदार अवयव नि गोलसर बाधा. पण चोळी काढून टाकली होती. देवरामला वाटलें, ती बाजूलाच कुठे पडली असावी!— दोन्ही हातानीं पदर वक्षस्थळावर धरून ती अधोवदना उभी होती. तिची पदर धरण्याची पद्धत, ते लांब गोरे बाहू, ती लाडिक हनुवटी, अन् भांगेची रेख...ही कुठेतरी पाहिली आहे, कुठेंतरी दिसली आहे, अस देवरामला सारखं वाटूं लागलं!—नदीवर येणारी मंजू, कीं पारिजातकाची फुलं गोळा करणारी सगुणा, कीं...देवरामला नक्की आठवेना. अखेर तो नाद सोडून देऊन बाजूला रांगणाऱ्या बालकाकडे पाहूं लागला.

तेवढ्यात स्टूडियोच्या टोकाला असलेल्या कुत्र्यानें देवरामाचे लक्ष वेधून घेतलें. तो भयंकर दचकला. किती हुबेहुब होता तो कुत्रा! कान टवकारून, नाक फेंदारून, भुंकण्याच्या तयारींत होता. डौलदार पण घाबरवून सोडणारा!— ती बाजूची गाय जितकी गरीब तितकाच हा कुत्रा क्रूर! पण दोघेंही आकर्षक, अन्—अन् खऱ्यासारखीं!

देवराम धिटाईनें पुढें आला अन् आजूबाजूला मांडलेले पुतळे पाहूं लागला. खाली वाकून एक तरुण कामगार कुदळीचे घाव घालण्याच्या

तयारींत उभा होता. घामानें निथळणारें, रापलेलें, पिळदार शरीर अन् खूप ताकदीनें उचललेली भक्कम कुदळ !—तसाच तो बंदुकीचा नेम धरलेला शिकारी. एक गुडघा टेकलेला, एक डोळा मिटलेला. नेम इतका अचूक धरला होता कीं, गोळी चुकणेंच शक्य नाहीं. अन् गोळी कुठल्या क्षणाला सुटेल तें सागता येणारे नव्हते ! एक पांढऱ्या केसाची गुबगुबीत माजरी आपल्या पिलाना पाजीत शातपणें पडली होती. एक भंगी डोक्यावर पाटी व हातांत खराटा घेऊन उभा होता. एक नर्तिका चाळ बांधून नि दोन्ही हातांची ओंजळ करून आदा करायच्या आविर्भावात उभी केली होती. एक उघडया पोटाचा लठ्ठ भटजी भस्म फासून पोथीचें पान हातात धरून बसवला होता.

समोरच्या भितीशी जरा उंचावर विठ्ठलाची मूर्ति ठेवली होती. इतक्या देवादिकाच्या मूर्ति पाहिल्या, पण विटेवर उभ्या असलेल्या विठ्ठलाची अशी आकृति आजवर पाहण्यांत आली नव्हती. अगदीं देव भेटल्यासारखें देव-रामला वाटलें ! पण मग आपण इतके भारावलों ह्याचा त्याला विस्मय वाटला. हुबेहूब दिसणाऱ्या असल्या तरी ह्या दगडमातीच्या आकृति आहेत. मापट्याला गणपति करतात तश्याच ह्या !—देवराम हंसायचा यत्न करून मन मोकळें करायला पाहात होता. पण विठ्ठलाच्या मूर्तिजवळ एक मोठा मासा व त्याच्या पारदर्शक पोटात एक काचेचें भाडें काढले होते; तें काय आहे हें समजून घ्यायला त्याचा मेंदू शिणत होता.

अंमळशानें तो पुन्हा साऱ्या कलाकृतीत रमून गेला. त्याच्याच जवळ एक दहाबारा वर्षांच्या मुलीचा खऱ्या आकाराचा पुतळा होता. पुतळा स्थिर होता, पण ती परकरी पोर पायऱ्या उतरून पळून जात आहे असे दाखवले होतें, अन् तेंच खरें वाटत होतें. त्याच्यामागें कुणी संस्थानिक उभे होते. चेहेरा उर्मट होता. पण त्यांच्या फेट्यावरील तुरा इतका मोहक होता कीं, देवरामनें त्याला हलकेच हात लावला.

त्या पलीकडे आणखी एक विवस्त्र अप्सरा होतीच. कोपरा माथ्याखालीं घेऊन ती आसनावर विसांवली होती. भारलेल्या भावनेनें, लोभावणाऱ्या लावण्यानें, तिच्या पावलांना हात लावला तर—

किसन कांहींतरी बडबडत आहे असे वाटून देवराम भानावर आला. साऱ्या पुतळ्याकडे पाहताना किती गुंगून गेला होता तो! किसन म्हणाला होता,

" चाट झालास कीं नाहीं? मातींतून माणसं निर्माण करणारे ब्रह्मदेव आहेत आमचे चंद्रशेखरसाहेब!—अन् आम्ही मापट्याला छापाचे गणपती बनवीत बसलों होतों! जगापासून दूर असलेलं निर्जन, निर्जीव खेडं तें!—बरं झालं बुवा ह्या मुंबईच्या गजबजाटांत आलो नि साहेबाना चिकटून राहिलों."

देवरामनें एक दीर्घ जाभई दिली. किसननें दिवे मालवले. अन् दोघेहि मधल्या मोकळ्या जागेंत पसरलेल्या पथाऱ्यांवर पहुडले. किसन अर्धवट पुटपुटत घोरूं लागला. देवरामनें ठणकणाऱ्या डोळ्यावर हात ठेवला, अन् जाग्रणाने जळणारे डोळे मिटून घेतले.

हळूहळू सारें शात झालें. कुठल्याशा फटींतून येणारा चंद्रप्रकाशाचा पट्टा, भिंतीवरच्या घड्याळाची संथ टिकटिक अन् किसनच्या घोरण्याचा घोगरा स्वर येवढेंच जाणवत होते.

बराच वेळ गेला.

अन् मग एकदम दचकून देवराम जागा झाला. दारापासचा कुत्रा मोठ्यानें भुंकत होता. कान टंवकारून, नाक फेंदारून!—देवरामला वाटले, तो आपल्याकडे झेंप घेणार अन् आपल्या पोटरीचा लचका तोडणार!—त्यानें चटकन् आपल्या शरीराचें मुटकुळें केलें, आणि श्वास रोखून घेतला.

चंद्रप्रकाशाच्या आधारानें देवरामनें डोळे उघडले, अन् शेजारीं किसन झोपलेला पाहिल्यावर त्याला धीर आला. खरा कुत्रा कुठला, पुतळा आहे नुसता!—मनाला धीर देत देवरामनें कुशी बदलली, व डोळे मिटले. कुत्रा भुंकतो असा भास होत होताच. पण तिकडे दुर्लक्ष करायचा निश्चय करून देवराम शांत पडून राहिला.

'भुंकू दे लेकाला. पुतळा कुठचा—'

—पण हें रागणारें मूल भिऊन केवढ्यानें रडतें आहे—देवरामने दचकून डोळे उघडले व तो बुबुळें मोठीं करून त्या मुलाच्या मूर्तिकडे पाहूं लागला.

रांगत रांगत तें पोर देवरामकडेच येत होतें. देवरामनें हात पुढें केले. अन् शरमून मागें घेतले. केवढा बावळटपणा हा, असें त्याचें त्यालाच वाटलें, नि तो स्वस्थ पडून राहिला. तें मूल मात्र रडत होतेंच. अन् त्यामुळें कुत्र्याचें भुंकणेंहि संपत नव्हतें !

मग सारें शांत झालें ! देवरामनें डोळे उघडून एकवार चौफेर नजर टाकली. उगाच भास सारा. चोराचा, भुतांचा भास होतो तसा ! स्वतःच्या मनाला थोपटत त्यानें डोक्यावरून पांघरूण घेतलें. आणि मनानें आंकडे मोजीत तो झोपीं गेला.

पुन्हा बराच वेळ गेला. अन् मग देवरामनें श्वास रोधून हलकेंच डोक्या-वरचें पांघरूण काढलें. आवाज न होऊं देतां तो उठून बसला ! उजव्या कोंपऱ्यांतल्या मंचकावरील स्कंधाजवळ कोपर घेऊन पहुडलेली लावण्यवती त्याला बोलावीत होती !...

अंथरुणावर बसून आसुसलेल्या मनानें देवराम पाहूं लागला. मंचकाच्या एका बाजूला ती सरकली होती. तिची नजर त्याच्याकडेच वळली होती. अन् आता खाद्यापासचा टेकलेला हात पुढें होऊन त्याला खुणावूं लागला. लावण्य त्याला बोलावीत होतें, तारुण्य त्याला बोलावीत होतें ! देवरामच्या मनांत आग पेटली. जावें कीं नाहीं ? कसें जावें ?—तो विचार करूं लागला, वाटा शोधूं लागला. त्या तरुणीसमोरचा तो डौलदार फेट्याचा सरदार पुढेंच पहारा करीत होता. ती त्याची स्त्री असेल. एकादी राणी किंवा दासी. म्हणूनच ती आपल्याला बोलावीत असेल ! पण त्या सरदाराला, त्या फौजदाराला फसवून कसें जायचें ?

खेरीज तेथून ती परकरी पोर पायऱ्यांवरून उतरत होती. अन् केवढ्याने गाणे म्हणत जात होती ती. आजच्या लग्नसमारंभांत गाणें म्हण-णाऱ्या मुलीसारखी. अन् ह्या मुंबईच्या मुली मोठ्या धीट नि चौकस असतात. तिनें थांबवून विचारलें तर ! काय सांगणार कपाळ ?

देवरामचा विरस झाला, हताशपणें तो पाहूं लागला. तेवढ्यांत त्या संस्थानिकानें आपला तुरेबाज फेटा उतरवून ठेवला. अन् तो त्या मेनकेकडे

वळला !—देवरामच्या डोळ्यापुढें अंधेरी आली. त्यानें अंथरुणावर अंग लोटून दिलें. आतां फक्त झोप ! तो झोपेची आराधना करूं लागला !

वेळ फुकट जात होता. वास्तविक इतका वेळ उगाच फुकट गेला. कोपऱ्यातल्या घडवचीजवळ ती दुसरी लतिका आहे की !—देवराम पुन्हां उठून बसला. खालीं मान घालून ती नितळ अंगाची, उंच बांध्याची, शालीन युवती अजून त्याची वाट पाहात उभी होती. किती ताटकळत राहावे लागलें बिचारीला ! देवराम घाईने उठला. अन् तिच्या दिशेनें जाऊं लागला. डोळे उघडून, श्वास रोधून, पावलें हलकेंच टाकीत,......

तेवढ्यात भटजी घडाघडा पोथी वाचूं लागले. कामगारानें कुदळीनें भराभर जमीन खणायला सुरवात केली, शिकाऱ्याने बंदुकीने जोरानें बार काढले. तें मूल मोठ्याने किंचाळूं लागलें. अन् कुत्रा विलक्षण जोरानें ओरडूं लागला.

—देवराम दचकून उडी मारून अंथरुणांत परतला. त्याची छाती धडधडूं लागली अन् सर्वांग घामाने डबडबलें. पांघरुणात शिरल्यावर सारें शांत झालें. पण देवराम लाजेनें अगदींच अर्धमेला झाला. आपण आचरटासारखे उठलो काय ! अन् मूर्खासारखे भ्यायलो काय—असे त्याला एकीकडे वाटत होते. तरीपण तो डोक्यावरचे पांघरूण काढीत नव्हता. अन् त्यातूनहि त्याला बाजूला उभ्या असलेल्या म्हाताऱ्याचे ठसक्यात येणारे शब्द ऐकूं येत होते,—"पाहिलंस पोरा ! मुंबईत हे मोह पाडणारे प्रसंग येतात. आपल्यासारख्या शांत वास्तूंतल्या लोकानी..."

काही न ऐकता, काहीं न पाहता, काही न विचार करतां, नुसतें निद्रेच्या स्वाधीन व्हायचे देवरामनें ठरवले. ठणकणाऱ्या डोळ्यांवर कोंपर ठेवून त्याने तोंडावरून पांघरूण घेतलें. अन् तो झोपी गेला.

डोक्यातले ठोके मंदावूं लागले. हळुहळू देवरामला तबल्याचे ठोके स्पष्ट ऐकूं येऊं लागले. समोर उभी असलेली नर्तिका नाचूं लागली. तिच्या पायांतले चाळ वाजूं लागले. पावलें पडूं लागलीं. हातांच्या हालचाली होऊं लागल्या. आदा करीत ती म्हणूं लागली, "लाडी गोडी पान मी देतें सजणा—" गाण्याची गति वाढूं लागली. बाजूच्या दोन्ही स्त्रिया नृत्यात

सामील झाल्या. आणिकहि कुठून बऱ्याचशा सुंदर ललना आल्या आणि फेर धरून केवढा वेळच्या नाचत राहिल्या.

नाच बराच वेळ चालला होता. मग देवरामनें कुशी बदलली. दुसऱ्या बाजूला कोपऱ्याकोपऱ्यानें भंगी खराटा फिरवीत चालला होता. कामगारानें कुदळ टाकून दिली अन् कपाळावरचा घाम बोटाने निपटून त्याने चंची काढली. देवरामला तो म्हणाला, " या राव, पान तर खा—"

देवराम अस्वस्थ झाला. अन् झोपेंत तळमळूं लागला. तेवढ्यात चुलीच्या उबेंत पडलेली माजरी फिसकारत उठली अन् भाड्यातल्या माशावर झडप घालूं लागली. तिची पिले चाचपडत गाईच्या आचळाना लोंबूं लागलीं. सगुणेनें बाजूला पडलेली काचोळी उचलली अन् ती प्राजक्ताचा सडा वेचूं लागली. मंचकावरच्या मेनकेला बाहुपाशात घेत सरदार मोठ्यानें हंसूं लागला. तें पाहून एक परकरी पोर पायऱ्यावरून धूम पळत सुटली. तिच्या मागोमाग जात काळ्या केसाचा मोठा कुत्रा सारखा भुकूं लागला. भटजी त्याहिपेक्षा उंच आवाज काढीत मंगलाष्टके म्हणूं लागले. अन् अठ्ठावीस युगे पायाखालीं दाबलेली वीट दूर टाकून उभा विठोबा गडबडा लोळत हंसत सुटला ! जो तो धावूं लागला. जो तो रडूं लागला. जो तो धडपडूं लागला ! मुलाचें रडणें, अप्सरेचें नाचणे, म्हाताऱ्याचे खोकणे, मुलींचे पळणें, सरदाराचे हंसणे, कुत्र्याचे भुकणे !...ती मुलगी पळताना भटजीवर आदळली नि तो तिला भयंकर शिव्या देऊं लागला. त्या सरदाराच्या एकातात रागल जाऊन ते पोर केकाटूं लागले. भंग्याने माजराची पिल्ले टोपलीत भरली नि खणणारा कामगार पानाच्या पिचकाऱ्या नर्तिकेच्या अंगावर टाकूं लागला. कुत्र्याने विठ्ठलाची वीट तोंडात धरली; अन् शिकारी बंदुकीच्या गोळ्या गाईच्या पोटांत झाडूं लागला. एकच गोंधळ, एकच कल्लोळ—अन् तो मासा आपल्याच पोटांतल्या पेल्यांत शिरत होता !

× × ×

शिल्पकार चंद्रशेखर सकाळची न्याहारी झाल्यावर लगेच स्टुडिओंत कामाला बसत. त्या वेळेच्या आत सर्व तयारी करणें जरूरीचें असे. म्हणून किसन सकाळी सहाला उठला नि शेजारीं झोपलेल्या देवरामला म्हणाला,

" ऊठ–केवढा वेळचा झोपला आहेस ! काल बोलता बोलतां झोंप लागली तों आतापर्यंत डाराडूर ! ऊठ आता. हे मापटं नाहीं खुशाल झोपा काणायला !–उद्योगी लोकाची मुंबई आहे ही—"

मोठ्या प्रयत्नानें देवराम उठून बसला. त्याचें डोकें जड झालें होतें. डोळे लाल पडले होते. झोप अगदी अपुरी झाली होती, झोप धडपणें लागलीच नव्हती. काल पहाटेपासूनचा प्रवास, दिवसभराची लग्नातली गडबड, अन् मग रात्रीचें––

देवरामने दचकून सभोवार पाहिलें. सकाळच्या उजेडात सारे पुतळे थंडरे पडले होते. देवरामनें सुटकेचा सुस्कारा सोडला !

किसनचा निरोप घेऊन तो कांदेवाडींत आला. दादरला आरामशीर झोपायला मिळालें म्हणून तरुण लोकानीं त्याचा हेवा केला. रात्रीं कामें चुकवून पळाला म्हणून म्हाताऱ्यांनीं त्याच्यावर टीका केली. देवराम आबावला होता, अन् भडकलाहि होता. तो कांहीं बोलला नाहीं.

पण सारे तेवढ्यावर थाबले ! नऊ वाजायला आले होते, अन् जो तो घाईत होता. काहीं पाहुणे पहाटेच परतले होते. उरलेले काहीं जण निघायची धादल करीत होते. दोन खोल्यातला पसारा झपाट्यानें आंवरून टाकला होता, जणू त्या जागेत कधीं लग्न लागलेंच नव्हतें. मांडवपरतणें, उरलेलीं भाडणें, श्रमभोजनें–कांही मागमूसहि नाहीं. जो तो आपल्या रोजच्या चाकोरीत धावत होता. एक दिवसाची रजा घेतलेला नवरदेव कंकण सोडवून ऑफिसला जायची लगबग करीत होता. करवली चार घांस खाऊन रेशनिंगच्या दुकानांत आंकडेमोडी करायला निघत होती. समोरच्याच चाळींतल्या सासरहून वधू घरीं परतली होती नि रॉकेलच्या रांगेंत उभी होती. नेहमींच्या दिनक्रमात फेर धरणें ह्या खेरीज दुसरें कांहीं ठाऊकच नव्हतें इथल्या लोकांना ! अंथरुगांत पडून रहाणें, मनसोक्त स्नान करणें, सावकाश व पोटभर जेवणें, विडा चघळत वामकुक्षी करणें !... नुसतीं यंत्रें होतीं माणसें ! नळावर गर्दी, पानावर गर्दी, रस्त्यावर गर्दी ! जणूं साप लागला होता मागें. जणूं सर्वांचो गाडी चुकत होती—छे ! देवराम त्रासून गेला ती वाडींतली वर्दळ पाहून !

वेगानें फिरणाऱ्या प्रचंड यंत्रात तो एखाद्या निगरगट्ट खिळ्यासारखा शून्यपणे बसला होता. त्याला काय करावें सुचत नव्हतें. झोप येत होती, पण भोंवतालची वर्दळ पाहून झोपायची शरम वाटत होती. घरीं परतावेसे वाटत होतें, पण खेडवळासारखें भिऊन पळून जाणें कसेसेंच वाटत होतें.

अखेर भुकटीच्या दुधाचा फिकट चहा पिऊन त्यानें उसना उत्साह आणला, अन् भटकायला म्हणून तो बाहेर पडला.

गर्दीनें जाणाऱ्या माणसाच्या लोंढ्याबरोबर तो ढकलत रस्त्यावर आला. आता तर खूपच गर्दी दिसत होती. माणसे भरभरून ट्रॅम्स उलटसुलट पळत होत्या. मोटारींची तर मुंग्यासारखी रांग होती. अनेक आवाज कानावर आदळत होते. अन् अनेक चेहरे इकडे धावत होते.

कोंपऱ्यावरच्या इराण्याच्या हॉटेलापाशीं देवराम जरा वेळ थांबला. हॉटेलमध्यें टेबलाटेबलावरून चहा दिला जात होता. कित्येक लोक चहा पिऊन जात होते. कपबश्याचा हॉटेलभर खणखणाट सुरू होता. अन् गल्ल्यापाशीं नाण्याची टपटप सपत नव्हती. हा बाजार जणू कधींच संपणारा नव्हता !

इकडे तिकडे पहात देवराम फुटपाथवरून चालूं लागला. एका छोट्याशा दुकानात वर्तमानपत्रें—मासिकें मांडून ठेवली होती. किती तऱ्हेची, किती आकाराचीं !—अन् साऱ्याचा तडाखेबंद खप होत होता. पलीकडे एका बंद दुकानाशीं माणसाची ओळ वळवळत होती. तरुण, म्हातारे, बायका, बाले ! बिळात घुसणाऱ्या सापाप्रमाणें ती रांग दुकानात मुसंडी मारीत होती, आणि मारुतीच्या शेपटासारखी लांबत होती. जवळजवळच्या दुकानातून निरनिराळे रेडिओ ओरडत होते. अन् त्यातले बोलण्याचे आवाज व गाण्याचे स्वर एकमेकावर आदळत होते. वळणावरच्या पोस्टाच्या पेटीत मिनिटामिनिटाला कुणी कुणी पत्रें टाकीत होते. अन् कोपऱ्यांत उभा राहून एक बुटका आंधळा एकसारखा ‘ विठोबा विठोबा ’ म्हणून बोंबलत होता.

ह्या साऱ्या ललिताचं देवरामला भारी भय वाटलं. ट्रॅमच्या स्टॉपपाशीं तो उभा राहून उदासपणें सभोंवार पाहूं लागला. ही गरगर फिरणारी सर्कस कशी थांबेल ? कोण थांबवील ? स्टॉपपाशींसुद्धां ट्रॅम्स थांबत नव्हत्या !—

देवरामला वाटलें, पुढे होऊन ट्रॅमचा दाडा ओढावा. दुकानापुढच्या रांगेंत उंदीर सोडावा, पोस्टाची पेटी पळवून न्यावी, त्या आंधळ्याला मुका करावा—

कुठलशी ट्रॅम थाबली. देवरामच्या भोंवतालचे लोक धावले. तोहि नकळत धांवला व ट्रॅममध्ये घुसला. ट्रॅम पिसाटासारखी पळूं लागली. उतारूंच्या घोळक्यांत धांपा टाकीत देवराम कसाबसा उभा राहिला. ट्रॅममध्यें सुद्धा लोक धक्के देत होते, बडबडत होते. त्या गर्दीगोंगाटात देवराम अगदी गुदमरून गेला! अन ही सारी वरात एका मोठ्या जत्रेतून मिरवत चालली होती...

मग ही शर्यत सोडून देवराम ट्रॅममधून कुठेतरी उतरला. फूटपाथवर उडी मारून समोरच्या हॉटेलात शिरला. त्याला जरा बरे वाटले, मोकळे वाटले! हॉटेलातहि वर्दळ होतीच, पण ट्रॅमपेक्षा खूपच कमी!—कोपऱ्यातल्या टेबलाशी बसून देवराम इकडे तिकडे पाहूं लागला. तेच, तसेच चेहेरे. एकाच छापाचे, मुर्दाड भावनेने माखलेले!

दुकानातल्या फोनोवर भजनाचा गोंधळ गर्जत होता. रेकॉर्डचा कुठेतरी टवका उडाला होता अन् गाणे तिथे येऊन थबकले होते. तोच शब्द सारखा घोटाळत राहिला,— 'तुका म्हणे धन्य जगीं, राम—' अन् मग एकसारखं तेथेच राम राम राम राम. तें 'मरा मरा' देवरामला फार आवडलें! त्यानें लेमन मागवलें व बर्फाचा तुकडा तोंडात टाकला.

—त्याला एकदम मापट्याची आठवण आली! सारवलेल्या स्वच्छ ओंवरीवर तो दुपारचा पहुडला होता. सगळीकडे रखरखीत शांतता होती. गोठ्यात गाई नि बैल डोळे मिटून शून्य बसले होते. आजूबाजूचीं सारीं खोपटीं तटस्थ झालीं होतीं. समोरचा डोंगर थंड झोपला होता. वारा वाहाणें बंद झालें होतें. आकाशांतल्या आकृति अदृश्य झाल्या होत्या. विचार सुचत नव्हता, वेळ कळत नव्हता. सारें सुस्तावलें होतें, समाधिस्थ झालें होतें. चित्रासारखें! पुतळ्यासारखें!!

——मापस्याहून देवराम दणादिशीं मुंबईत टपकला. शहरांत उभा राहिला. शेजारच्या टेबलाशीं चारपाच तरुण तावातावानें राजकारणावर चर्चा करीत होते. अन् फोनोवर पंजाबी ढंगाचा गोंधळ सुरू होता.

देवराम पुन्हा फुटपाथवर आला अन् रेंगाळत चालू लागला...हॅट घातलेलीं, फेटा बांधलेलीं, खादी टोपी घातलेलीं, उंच काळी कॅप टेकवलेली...किती डोकीं! शिरस्त्राणाचें फिरतें प्रदर्शनच नुसतें! तरी पण बोडक्या डोक्यांची संख्या जास्त होती. लांबट डोक्यांचें, लांब केसांचे, कलप लावलेले, साफ टकले! बायकांतहि अनेक प्रकार! बॉब केलेल्या, पिना लावलेल्या, फुगे काढलेल्या, गंगावन घातलेल्या, कांहींच न केलेल्या... आकाशातली दृष्टि उतरवून तो जमिनीकडे पाहात चालूं लागला. उंच टाचांचे बूट, प्लास्टिकच्या सॅंडल्स, काळा पंपशू, पठाणी वहाणा, उघडा लंगडा पाय, अन् एक नुसती कुबडीची जोडी...देवरामनें डोळे मिटून घेतले ..पण मोटरचे कर्णे, ट्रॅमचा खडखडाट, घोड्यांच्या गाड्यांचा टप-टपाट, बुटांचे आवाज, एकमेकाला हाका मारणे, दुकानातलीं भांडणें, फोनो-रेडिओंतल्या ताना, दूरवरून ऐकू येणारे आगगाड्यांचे धडधडाट... छे——कांहींच सुचेना!

तेवढ्यात एकदम गलका झाला. अनेक आवाज ओरडले. वेगाने ब्रेक्स दाबून मोटरी थांबल्या, एकदम दबलेली शांतता पसरली.

देवरामने पाहिलें तो रस्त्यावर एक छोकरा मोटारीखालीं चेंगरला होता. भेदरलेल्या लोकांचें कोंडाळें त्याच्याभोंवतीं होत होतें. आजूबाजूचीं वाहनें थबकलीं होतीं. जो तो थांबला होता. दोन्ही बाजूच्या दगडी इमारतींतून जिवंत चेहरे चमकूं लागले होते.

देवराम दचकला. पण त्याला कसलेसें समाधान वाटलें. बंद पडलेलीं वाहनें व भावनांनीं भारावलेलीं माणसें, त्याला फार आवडलीं! हातात चेंडू तसाच ठेवून बेशुद्ध झालेला पोरगा त्याला तसाच पडलेला पाहा-वासा वाटला.

त्या मुलाला एका मोटारींत घातलें व मोटार वेगाने निघाली. माणसें पांगलीं. जो तो परत धांवूं लागला. मोटरचे कर्णे वाजले. ट्रॅम्स भरभरून

फिरूं लागल्या. धक्काबुक्की, आवाज ओरडे, सारे सुरळीत सुरू झाले. जसें काहीं क्षणापूर्वी काहींच घडले नाहीं. कुणी बेशुद्ध पडले नाहीं. अन् कुणी भानावर आलेंच नाहीं !

देवरामचे मन भडकून गेलें. काय भयकर लोक आहेत हे ! धावण्या-पलीकडे, स्वतःच्या आयुष्यात बुडून जाण्यापलीकडे, ह्याना काही सुचत नाहीं दुसरे ! माणसे आहेत की किल्ल्या दिलेल्या बाहुल्या आहेत ?

चौकातल्या बेटात देवराम दोन्ही हातानी डोके दाबून उभा राहिला. पायाला पेटके आले होते, डोळे जळत होते, अन् तोल जात होता. श्वास रोधून व मुठी आवळून तो अवसान आवरायला पहात होता. आजूबाजूची गर्दी, गोंगाट त्याला छळत होता. बाजूला उभा असलेला एक भिकारी सारखे रडगाणे गात होता. अन् समोरच्या इमारतींतून कुणी स्त्री सगिताच्या लहरीवर लहरी वाऱ्यावर फेकीत होती. कोपऱ्यावरच्या दुकानात कापडाचा तागा उघडून एक व्यापारी एका जोडप्याशी जोराने वाद घालीत होता. अन् बाजूच्या हॉटेलात असख्य गिऱ्हाइके भयंकर कलकलत होतीं. एकाला खिसेकापू लोकाचे कोडाळे पिटू पाहात होते. दूर उभा असलेला एक तरुण, पदर सावरीत वेगाने रस्ता ओलाडणाऱ्या तरुणीला सारखा खुणावीत होता. चारी रस्त्यानीं मिनिटामिनिटात वाहने वाजत जात होती, आणि त्यामधून रहदारी आटयापाटया खेळत मागे पुढे होत होती. बसस्टॉपशी रागा जमत होत्या, नि उधळत होत्या. अन् माणसाच्या उचीच्या वरील वातावरणात धुराच्या अनेक आकृति तयार होत होत्या व वितळून जात होत्या.

देवरामला थावता येईना नि चालता येईना. त्याला ओरडावेसे वाटले, पण तोंडांतून शब्दच उमटेना. डोळे मिटावेसे वाटले, पण पापण्यांची उघडझापहि होईना. आता दहा वाजायला आले. माणसाच्या महापुराला विलक्षण वेग आला. ट्रॅम्स, बसेस, मोटार गाडया तर वेड लागल्यासारख्या धावूं लागल्या. शाळकरी पोरे, कारकून, धंदेवाले सारेच उलट सुलट उडया मारीत सुटले. दुकानें गजबजलीं होतीं, हॉटेलें ओसंडत होतीं, पेढया

फुगत होत्या. रस्ते नि इमारती भरून ओसंडून गेल्या. विजेचे पाळणे खेपा करीत होते, टेलिफोनच्या घटा खणखणत होत्या......

देवरामच्या डोक्याच्या ठिकऱ्या व्हायची पाळी आली. कानाचे पडदे फाटणार, डोळ्यातली बुबुळे दिपणार असा भास होऊं लागला. सारी हाल-चाल, सारी गति तो भकासपणे पाहात होता. हें न सपणारं वेळेचें गाडें अडखळत नव्हते; अन् ह्या विलक्षण गतीला अचानक अपघात होत नव्हता !—आणि साऱ्या विलक्षण वर्दळीत देवरामचे पारदर्शक झालेलें मन पाण्याबाहेर पडलेल्या माशासारखें तडफडत होते...

अन् मग एकाएकी त्याच्या सताड डोळ्यापुढे एक विलक्षण दृश्य दिसले !—भरमसाट धावणारे जग, आणि धादल उडवून देणारी वाहने व माणसे एकदम थबकलीं. वेळ थाबला, काळ थाबला ! गति नाहीशी झाली, हालचाल खिळून गेली ! केवढे विलक्षण ! देवरामने कान टवकारले. पण कुठलाच आवाज उमटेना. सारें मूक झाले होते. डोळे फाडफाडून तो भिरभिरून पाहू लागला. पण सारं थबकले, स्तब्ध झालेले !—अन् तेंहि जे तें जिथल्या तिथे जसेच्या तसें !—चित्रासारखें, पुतळ्यासारखे. ट्रॅम्स व टॅक्सीज ब्रेक न दाबता, इषारे न देता जागच्याजागी अकस्मात बंद पडलेल्या होत्या. धडपडत धापा टाकीत वळवळणारी रहदारी जागो-जागीं तशीच अवघडून खिळून उभी होती. वाट मिळावी म्हणून फुटपाथवर थाबलेला म्हातारा तसाच कपाळाला आठ्या घालून व जबडा वासून उभा राहिलेला अन् भर मार्गावर धावणारा एक पोरगा मोटारसमोर त्याच पावित्र्यात तसाच ! बुटातला खडा काढण्यासाठीं ओणवा झालेला एक पठाण बुटात बोट अडकवून तसाच राहिला. ट्रॅम नाक्यापाशी थांबलेल्या तरुण स्त्रीनें ढळलेला पदर सावरण्यासाठी उचललेला हात तसाच थबकून राहिला व तिचा ढळणारा पदरहि पुरा घसरत नव्हता. दुकानदाराने दाखवण्यासाठी उलगडलेले कापड तसेच अतरपटासारखे उभें राहिलें, अन् त्याच्या दोन्ही बाजूला तें जोडपे चक्रवाकूपक्षाप्रमाणें दुरावून कायमचें उभें राहिलें. बाजूला बोंबलणारा भिकारी एकदम गप्प झाला व देवासारखा उभा राहिला. झेप घेणारी बस तशीच तिरकी खडी राहिली

व तेवढयांत आंत उडी घेणारी तरुणी हवेंतच अधांतरीं राहिली !—ट्रॅममध्यें चढणारे इसम चढतच होते. अन् बाजूला डोळे मिचकावून खूण करणाऱ्या तरुणाचें बोटहि तसेंच पुढे राहिलें होतें. खिसेकापूंवर जमावानें उगारलेले हात वरचेवर अधांतरीं राहिले होते. आणि खालीं वांकलेला चोर पळून न जाता अचल उभा होता. कुणीतरी सोडलेलीं सिगरेटचीं वलयें वातावरणांत कोरलीं गेली होतीं. अन् इमारतींतून येणारी संगीताची लहर इंद्रधनुष्या-सारखी अवकाशात दिपून उमटली होती. तो पकडला गेलेला क्षण अचल झाला, अस्ताव्यस्त पसरला. सारा चौकच एकाद्या स्टूडियोसारखा दिसत होता. अन् सारी हालचाल पुतळ्यासारखी खडी झाली होती. गतिसूचक भावदर्शक—पण तटस्थ, स्तब्ध.



## वात्सल्य : : ५

वत्सला साडी नेसायला लागल्यापासून चागलीच मोठी दिसू लागली होती. खरं म्हणजे ती मोठी झाल्यामुळेच साड्या नेसणें अवश्य होऊन बसलें होतें. तिच्या मामानीं बंगलोरहून आणलेल्या सिल्कचे परकर नि बाबानीं शाळेंत जाण्यासाठीं शिवलेले फ्रॉक्स तिला बासनात ठेवावे लागले होते. ते आता लहानहि होत, नि वाईटहि दिसत होते. ती आता चागलीच उफाड्याची वाटत होती, नि आकर्षकहि भासत होती. तिचें लहान मुलींशी बागडणें सुटलें होतें, अन् मोठ्या बायकाच्यात ती खपून जात होती. लहान पोरीसारखें मोठ्यानें बोलणे, हसत सुटणें इत्यादि सारें सरलें होतें. मोठ्या स्त्रियांप्रमाणें ती तोलून बोलू लागली होती, तीनदा तीनदां पदर सावरूं लागली होती. इतके दिवस कशातरी बांधून टाकलेल्या वेणींतले केस आता अनेक तऱ्हांनीं आकर्षकपणें गुंफले जात होते अन् त्यातुन काहीं कपाळावर बंडखोरपणें नाचत होते. आता रोजच सुवासिक कळ्या केसांच्या गुंफेत उमलूं लागल्या नि चमकणारे खडे कानाच्या पाळीशीं गुणगुणूं लागले. गालाचा गोडवा नि हनुवटीचा हळुवारपणा ह्यांची स्पर्धा सुरू झाली. भुवया मोडणें, मान वेळावणें नि निरर्थक गुणगुणणें हे नकळत सुरू झालें. अंथरुणावर लोळण राहणे, आरशासमोर विनाकारण खेळत राहणें, क्षितिजाकडे शून्यपणें पहात बसणे——वत्सला अंतर्बाह्य बदलली, अचानक बदलली! इतरानाच काय पण तिलाहि नकळत यौवनाचा शिल्पकार तिच्या शरीराला आकार देऊं लागला. उन्मादाच्या चित्रकारानें तिच्या मेंदूंत अनेक आकृति भरल्या, अन् तिच्या हृदयांत यक्षकवीनें हुरहुर लावणारें गीत सुरू केलें....

मग एक दिवस नेहमीप्रमाणें वच्छी सकाळची चहा पिऊन कादंबरी वाचीत बसली. मध्येच तिला आघोळीची लहर आली. नि बद बाथरूम-मध्ये ती पाण्याशीं खेळत गाऊं लागली. आरशाला वेडावीत तिने केशभूषा नि वेषभूषा केली. आणि आरशाकडून मनसोक्त कौतुक करून घेतल्यावर ती गंभीर बनली. पदर लपेटून संथ पावले टाकीत ती अभ्यासाच्या खोली-कडे वळली. तेवढयात बाजूला आरामखुर्चीवर वाचीत पडलेले बाबा म्हणाले,

" अहो,-ऐकलं का—आम्हाला चहा हवाय् ! "

वच्छी थबकली व थक्क होऊन पाहूं लागली. बाबानीं वर्तमानपत्रावरची नजर वळवली, अन् वत्सलेला पाहून ते दचकले. त्याना आपली चूक उमगली. हंसत हसत ते म्हणाले,

" तूं होय ?–मला वाटलं हीच आहे. "

आपण बाईएवढया दिसूं लागलो, ही कल्पना वच्छीला रुचली नाहीं. उत्तरादाखल ती कशीबशी हसली. पण बाबाचे हसूं वाढतच होते. हंसतच ते घरांत घुसले नि भाजी चिरणाऱ्या बायकोस म्हणाले,

" ए, वच्छी बघ आता केवढी दिसूं लागली आहे !—आतां इकडून जात होती तेव्हा मला वाटल तूंच चालली आहेस – "

बाईला पतिराजाच्या बोलण्याची गंमत वाटली. " हे काय बाई बोलणं ? —म्हणे, माझ्यासारखी दिसत्येय् ! एवढीशी चिमुरडी पोर—" स्वतःशींच पुटपुटत बाई भाजी चिरू लागली. पण बाबाना कुठलं राहवायला ? त्यानी वच्छीच्या दडाला धरून आणलें, बाईसमोर उभें केले नि म्हटले,

" बघ—बघ तुझी लेक !–कुणाला वाटायचं सुद्धा नाही तुझी मुलगी आहे म्हणून ? बहिणी बहिणी दिसतां अगदीं—"

वत्सला दूर झाली. लहान मुलीसारखे गाल फुगवून म्हणाली,

" हे हो काय बाबा !—मग मी आतां लहान आहे वाटतं ?– "

मोठया मुलीसारखा पदर सावरत वत्सला निघून गेली नि तिच्याकडे आश्चर्यानें पहाणाऱ्या बाईनें चमकून चहाच्या आधणांत चिरलेले बटाटे घातले.

× × ×

पतिराजांची कपबशी विसळून झाली, तरी बाईच्या मनात सुरू झालेले विचार आटोपले नाहींत. खरंच वच्छी चांगलीच मोठी दिसूं लागली आहे, हें बाईला बजावून जाणवूं लागलें आणि त्याचबरोबर ही गोष्ट इतके दिवस आपल्या ध्यानात आली नाहीं ह्याचा तिला विषाद वाटूं लागला. असें कसें झालें ? वत्सला मघाशींच ओलेत्यानें बाईच्या पुढून गेली होती. आता इथें आरशापुढें ती उभी होती. पण बाईला तसें कांहीं वाटलें नव्हतें. एकटीच मुलगी म्हणून दुर्लक्ष झाले, कीं वात्सल्याचा पडदा डोळ्यावर आला ? बाईला कांहीच कळेना, नि त्यामुळें स्वैपाकात सारखे घोटाळे उडूं लागले.

मग स्तोत्र म्हणायच्या ऐवजी बाईचे वत्सलेसंबंधीचें गुंजन पुढे चालू झाले. गेल्या आश्विनातच वच्छीला चौदावे वर्ष पूर्ण झाले होते. पहिल्यादा घेतलेल्या तिच्या साड्याहि फाटत चालल्या होत्या. अन्–अन् काय ? स्वतःच्या लेकीबद्दल इतकीच माहिती बाईला होती ! बाईला अधिक काहीच आठवेना. वच्छीची त्यानीं कित्येक दिवसात पुढ्यात घेऊन वेणी घातली नव्हती. एवढेच काय–वत्सला बाईशी कित्येक दिवसात मोकळेपणानें बोलली नव्हती. अन् बाईने कित्येक दिवसात वत्सलेच्या मुखावरुन हात फिरवला नव्हता. पोटची लेक, पण किती दुरावली होती, परकी झाली होती ! बाईला वाटले, असेच जावे नि वत्सलेला कुरवाळावे. लहानग्या वच्छूला थोपटत होतो, तसें थोपटावे. फ्रॉक घालून बागडणाऱ्या वच्छीला माडीवर घेत होतो, तसे घ्यावे. परकरी वत्सलेचा पापा घेत होतो, तसे करावे. पण बाईला धीर झाला नाही, अन् तिचे मन माघार घेऊं लागले.

जेवायची वेळ झाली व वच्छी घरात येऊन पाटपाणी करू लागली. तेव्हा बाई तिला चोरून निरखूं लागली. वत्सलेचें मोहक रूप पाहून बाईला आनंद वाटला. अन् अभिमानहि. किती गोड दिसायला लागली आहे. अंगापिडानें चागलीच वाढली आहे, भरली आहे, फुलली आहे ! केवढी उंच दिसूं लागली आहे, अन् केवढी भारदस्त ! इतके असून मूळचा नाजूकपणा, कोवळेपणा कायम आहे !–ही आपली लेक आहे; आपल्या-सारखी आहे !

बाईनें मीठ वाढणाऱ्या वच्छीकडे टक लावून पाहिलें. आपण—आपण अशा दिसत होतों ?—कशा दिसत होतों ?—चौदाव्या वर्षी बाईचें लग्न झालें होतें. त्यावेळी फोटो काढला होता, त्यात अंगावर ढीगभर दागिने होते नि मान खालीं होती. आपण इतक्या सुंदर होतों; पण इतक्या मोकळ्या, इतक्या कोवळ्या...

आपली नि वत्सलेची तुलना करतां करतां बाई घाबरून गेली. कांहीं-तरी फार मोठा फरक पडला आहे, काहीतरी चुकलेंय, चुकणार आहे, असें बाईला वाटूं लागलें. अभिमान उडून गेला नि आनंद ओघळला. चुकचुकणारें बाईचें मन माजघरांत डोकावलें. जेवण्यासाठीं नाना, भाऊ, वसंत नि वारकरीहि हजर झाले होते. ऑफिसला जाणारे, कॉलेजला जाणारे, शाळेला जाणारे. बाईला काय वाटलें, कुणास ठाऊक, ती चटकन् पुढें आली. सर्वांचीं एका ओळीत असलेलीं पानें तिनें पाहिलीं, अन् चटकन् वत्सलेचें कडेचें पान तिनें आडव्या बाजूला घेतलें. आतां सर्व पुरुष एका पंक्तींत, नि बाजूला वत्सला ! बाईला बरें वाटलें. अन् कुणी कांहीं बोलायच्या आंत ती वच्छीला म्हणाली,

"असं इकडे पान घेत जा तुझं ! उजेड नको का नीट यायला पानावर ?— "

× × ×

उशाशीं लुगड्याचा बोळा घेऊन बाई दुपारची लवंडली होती. बाहेर उन्हें माजलीं होतीं नि शुकशुकाट झाला होता. बाई आडवी झाली होती, पण तिला झोप येत नव्हती. दाराशीं कुणी उभें आहे, घरांत कुणी वावरत आहे, असें तिला वाटत होतें. गेले दोन तीन दिवस ही वर्दळ तिच्या मनांत सुरू झाली होती. मनातला हा धसका कुणाला सांगायची सोय नव्हती. कुणाला सांगणार ?—ज्याचें त्यानें सांभाळलें पाहिजे...

थोडया वेळानें बाई उठली नि ह्या खोलींतून त्या खोलींत उगाचच हिंडूं लागली. पतिराजांनीं सोडून टाकलेल्या धोतराच्या निऱ्या करून तें तिनें ठेवून दिलें. टेबलावरच्या फडफडणाऱ्या कागदांवर अडकित्ता ठेवून दिला. वसंतानें वांकडी केलेली घडवंची सरळ केली. सैंपाकघराची कडी

उघडली नि घातली. मग तिची नजर परत घरभर वावरली. कुठें काहींच आवरण्यासारखे नव्हतें. आतां मात्र वत्सलेच्या अभ्यासाच्या डेस्काकडे जाण्याखेरीज काम उरलें नव्हतें. नाइलाजानें ती आली नि कशीबशी उभी राहिली.

ह्या डेस्काशीं बसून वच्छी सकाळचा नि रात्रीचा वेळ घालवीत असते. अभ्यास करायला, पुस्तकें वाचायला, अन्—अन् कशाला ?—बाईनें डेस्का-वरचीं पुस्तकें चाळलीं. इंग्लंडचा इतिहास, जगाचा भूगोल, भूमितीचे सिद्धांत. पूर्वीं वाटलेला अभिमान एकवार उसळून आला. पण पुन्हा हृदयींची धडधड सुरूं झाली, डेस्क उघडून बाई आंतल्या वस्तू पाहूं लागली. चार आणे मालेंतल्या कादबरीचें पुस्तक उघडें ठेवले होतें. बाईच्या छातींत धस्स झाले. पुस्तक उघडून तिने ते पदराखालीं लपवलें. डेस्काच्या एका कोपऱ्यात वेलदोड्याचीं साले, पेन्सिलीचे तुकडे, ब्लेडची पाती, सिनेमाचीं तिकिटे टाकून दिलीं होतीं. त्या अडगळीकडे एकाद्या गुप्त धनासारखी बाई पाहूं लागली. वेलदोडयाचीं साले इथे कशीं नि का आलीं ? अन् गेली होती कधी ही सिनेमाला ?—साऱ्या वस्तू चाळवीत बाई केवढा वेळची बसली होती.

मग डेस्काच्या दुसऱ्या कोपऱ्यात पत्रलेखनाचे पॅड पाहताच तिच्या छातींत पुन्हां धस्स झाले. अर्धेंच पॅड उरलें होतें. कुणाला लिहिते पत्र ही कार्टी ?—टिपकागदावर उमटलेलीं उलटीं अक्षरे वाचता वाचता बाईचें डोकें दुखून आलें. नाइलाजाने ती दूर झाली. वच्छीच्या ध्यानात येईल ह्या शंकेने तिने तेवढ्यात सर्व वस्तू होत्या तशा ठेवायचा यत्न केला. अन् वच्छीच्या ध्यानात न येईल असा जागता पहारा तिच्यावर ठेवायचा ठाम बेत ठरला.

तेवढ्यात तिची नजर समोरच्या खिडकीकडे गेली. खिडकीच्या फळींवर ‘ प्रभाकर जोशी ’ असें खडूनें लिहिलें होते. समोरचा प्रभाकरहि आता वच्छीएवढा मोठा झालाय कीं !—अन् तो ह्या खिडकींतच वाचीत बसत असेल, उभा राहात असेल, वच्छींशीं बोलत असेल ! बाईच्या छातींत केवढयानें धडधडलें. तिला कांहीं सुचेना. तिने अचानक वच्छीचे डेस्कच उचललें, अन् दुसऱ्या खोलींत नेलें ! इथें वच्छी अभ्यासाला बसली म्हणजे कसा

दिसेल प्रभाकर ? म्हणजे आपल्याला स्वैपाकघरातूनहि तिच्यावर नजर ठेवतां येईल.

बाईनें पदराखालचें पुस्तक बंबांत टाकलें. अन् लुगड्याचा बोळा उशाशीं घेऊन ती आडवी झाली. तिला झोपायचे नव्हते. पडल्या पडल्या वच्छीच्या डेस्ककडे पाहात राहायचे होते !

× × ×

संध्याकाळची चहा-खाणीं झालीं, तरी बाई स्वैपाकघरातच काहींतरी काम शोधूं लागली. गेले काहीं आठवडे हाच उद्योग तिने रोज संध्याकाळीं आरंभिला होता. संध्याकाळीं नाना आणि हे ऑफिसांतून आले कीं त्याचा चहा होई; अन् मग वच्छीचे नि वसंताचें खायचें काढून ठेवून त्या देव-दर्शनाला अगर कुणाकडे बसायला म्हणून बाहेर पडत. पण आजकाल देवाला जायला अगर शेजारणीकडे जायला त्याना परवडत नव्हतें. घरांतलीं कामें टाकून शेजारणींकडे गप्पा झोडणे त्याना आवडेनासें झालें होतें. अन् देवदर्शन काय ? कुठूनहि देवाला नमस्कार केला तरी तो त्याला पोचतोच.

फडताळातलीं भांडीं तीनतीनदा नीट ठेवीत बाईने देवाला असंख्य वेळां नमस्कार केला. अन् नवससुद्धां. घडूं दे बाई सारं सुरळीत; धडपणीं. आता पर्यंत सारं ठीक होत आलंय्; आता काहीं विघ्न नको. तोंड काळं होईल असं कांहीं व्हायला नको...

बाहेरच्या खोलींत एकदम मोठा हंशा झाला अन् बाई विलक्षण दचकली तिला वाटलें, आपल्यालाच हंसले सारे ! हंसायला काय होतें ह्यांना?-वयात आलेली मुलगी घरात वावरत असली म्हणजे काळजांत कसें कालवत असतें तें काय कळणार ह्यांना ? बाईला अगदीं भय वाटल्यासारखें झालें. तेवढ्यांत वत्सलेचा एकटीचा हंसण्याचा आवाज आला. केवढया मोठ्यानें, केवढया पुरुषी थाटानें !-अन् पुरुषांत बसून...

बाई तिरीमिरीनें बाहेर आली. नि वसंताच्या पाठींत धपाटा घालून म्हणाली, " मोठ्या माणसांत काय बसला आहेस गप्पा ऐकत !—खेळायला नाहीं का जायचं तुला ?—घरकोंबडा कुठला—"

वसंता दचकला नि रडत रडत उठला. सर्वांनाच विस्मय वाटला. नाना म्हणाला, " अग अशी मारतेस काय त्याला ? " भाऊ न बोलता उठला नि सायकलींत हवा भरूं लागला. वत्सलेने देखील कपाळाला आठ्या घालून बाईकडे पाहिले.

वत्सलेने मारक्या म्हशीसारखें आपल्याकडे पाहिलें हें बाईच्या नजरेंतून सुटले नाही. अन् तिच्या त्या नजरेचे बाईला भारी भय वाटलें !

मग संध्याकाळच्या स्वैपाकासाठी डाळतांदूळ काढताना बाईचे मन पुन्हा पिंगा घालूं लागलें. वच्छी आपला राग करूं लागली आहे, ह्याची तिला चीड आली. तिचे फार लाड झाले, तिला फार मोकळीक मिळाली, म्हणून ती शेफारली, बेफाम झाली, असे तिला पक्के वाटू लागलें. तिच्यावर पहारा कसा ठेवावा, दरारा कसा बसवावा, ह्याचे बेत ती बांधूं लागली.

जराशाने वत्सला ओरडून म्हणाली, " आई, मी जरा मैत्रिणीकडे जाऊन येते ग–" वच्छीचे ओरडणे नि धावत जाणे बाईला रुचलें नाही. ती लगोलग धावली नि ओरडत म्हणाली,

" ए–कुठे चाललीस ? मागे फीर ! काहीं आता मैत्रिणीकडे जायला नकोय्. अंधार पडत चाललाय्–"

वत्सला हिरमुसून वळली व म्हणाली,

" इश्श्य, सहाच वाजताहेत ! अन् घरीं बसून काय करूं ग ? जाऊन येते ना सुधाकडे. "

बाईला सारी घड्याळें खोटी वाटलीं, सुधा अवदसा वाटली, कुणीतरी भयंकर कट करून आपल्याला फसवत आहे असें वाटलें. ती गरजली,

" आत हो मुकाट्यानें. सांगितलं जाऊ नको तरी तुझा हेका आहेच वाटतं !– तरण्याताठ्या मुलींनी तिन्हीसांजचं काही बाहेर जायचं नाहीं. हो घरात ! अन् जरा स्वैपाकाकडे बघ. सारा वेळ हुंदडत असतेस नुसती. उद्या सासरीं गेलीस कीं—"

वत्सला तणतणत घरात गेली नि अभ्यासाचें पुस्तक काढून डेस्काशीं बसली. बाईला समाधान वाटलें, शांत शांत वाटलें. पण क्षणभरच. पुन्हां

सावधचित्तानें ती वच्छीच्या हालचालीकडे नजर ठेवीत चूल पेटवूं लागली. त्या सावधतेतच आता सारें समाधान सांठवले होतें.

× × ×

किर्रर्र तिन्हीसाजा झाल्या अन् बाईच्या मनांत काळोख वाढूं लागला. स्वैंपाकघरातून देवघरात अन् तेथून बाहेरच्या दारांत अशा तिच्या सारख्या फेऱ्या सुरू होत्या. सारा स्वैंपाक तयार होता, देवाला सारे नवस बोलून झाले होते, पण बाहेरच्या दारात वत्सलेची मूर्ति दिसत नव्हती. हे केव्हाच घरीं आले होते, नाना क्लबातून परतला होता, भाऊ नि वसंताहि येऊन अभ्यासाला बसले होते. पण वत्सला अजून आली नव्हती, तिचा मागमूसहि नव्हता.

बाईच्या मनात काळजी वाटू लागली. आपले तोंडहि काळें होणार कीं काय ह्या धास्तीने तिला सुचेनासें झाले होतें. पाय लटलट कापत होते नि घशाला कोरड पडत होती. जरा खुट्ट झालें कीं बाई दारात धावत येई. रस्त्यावर कुणाची आकृति दिसली कीं, अधीरी होई. अन् पुन्हा निराशेने, शरमेनें, धसक्यानें अर्धमेली होई.

वच्छीला ट्रिपला जाऊं दिले हीच चूक झाली, असे बाईला प्रथमपासून वाटत होते. ती संमती द्यायला मुळींच तयार नव्हती. शाळेच्या नाटकात काम करायचे म्हणून वच्छीने नुसते सुचवलें, तेव्हा केवढें आकाशपाताळ एक केले बाईने !–नुसत्या मुलींचे नाटक असले म्हणून काय झाले ? किती केलें तरी नाटकच ते !–शेजारी पुरुष असणारच कीं ! पण आजच्या ट्रिपच्या बाबतींत बाईची फसगत झाली. वत्सलेनें परस्पर बाबाना विचारलें, अन् मग दोघानीं मिळून बाईला बनवलें ! बाई भोळी, भुलली. तिला वाटलें, सकाळीं जाऊन संध्याकाळी परतणार आहेत सारीं, खेरीज मास्तरीणबाई आहेत बरोबर, अन्—

आता बाईला साऱ्याच गोष्टीचा पश्चात्ताप होत होता. आपण इतक्या कशा बनलों ? इतका मूर्खपणा कसा घडला आपल्या हातून ?–आज दोन तीन महिने कशी परिघात ठेवली होती, पहाऱ्यांत ठेवली होती ! मग आजच कशी चूक झाली ? ह्याचे परिणाम जन्मभर भोगावे लागणार काय ?—

बाई पोळत होती, विव्हळत होती. तिला कांहीं सुचत नव्हतें. आजवर प्रत्येक क्षणाला ती डोळ्यात तेल घालून जागरूक राहिली होती. वत्सलेला इकडे तिकडे व्हायला तिनें संधीहि शिल्लक ठेवली नव्हती. समोरचा प्रभाकर एकदां पुस्तक मागायला आला होता. त्याला परस्परच वाटेला लावला होता तिनें. स्टेशनरी दुकानांतला माणूस वत्सलेच्या जरा जास्ती ओळखीचा झाला आहे, अन् तिला स्वस्त नि चांगल्या वस्तू देतो, हें कळल्यावर बाईनें त्या दुकानातले खातें बंद केले होतें. खालीं मान घालून वावरणाऱ्या वारकऱ्याची पायरीहि बाईने त्याला दाखवून ठेवली होती. एवढेंच काय, वत्सलेनें आपल्या बरोबरीच्या भावाशी दंगामस्ती करावी, हेंहि बाईला रुचेनासें झालें नि तिनें तें बंद केलें !

पण घराबाहेर, पारेघाबाहेर कुठे बघणार, बाध घालणार ?-शाळेला म्हणून वच्छी बाहेर पडली की, सहा तास ती काय करते हे कोण पहाणार? तिचीं पुस्तके व पावडरी, तिच्या मैत्रिणी नि त्याच्या गप्पा ह्यातून किती धागे हातीं लागणार ? खेरीज नुसती सहा तासाची शाळाच नाहीं, सभा आहेत, समेलनें आहेत, सफरी आहेत...

बाईला साऱ्या गोष्टींचा संताप आला. सफरीच काय, शाळासुद्धा बंद करून टाकली पाहिजे वच्छीची. साऱ्याच मुलींचे शिक्षण थांबवले पाहिजे; अन् जरा मोठ्या झाल्या कीं लग्नें करून दिलीं पाहिजेत ! बाई शिक्षणावर, सुधारणेवर रागवत होती. अन् तरीही वच्छीचा मागमूस नाही, म्हणून रडकुंडीस येत होती.

अंधार वाढत चालला आणि बाईच्या हृदयात आग पेटूं लागली. तिला नाहीं नाही तें सुचूं लागलें, आठवूं लागलें. मास्तरीणबाई वर्तनाच्या चांगल्या नाहींत, अशी कधीकाळीं ऐकलेली कुणकुण रातकिडयासारखी किरकिरूं लागली. शेजारची नटवी नि ढालगज सुधाहि ट्रिपला गेली आहे हें ध्यानात आल्यावर तिचें मन टकटकूं लागले. शाळेंतला एकादा मास्तरहि बरोबर असेल; कुसूम काळेचा तो गाणें म्हणणारा भाऊहि गेला असेल; शाळेंतली एक मुलगी पूर्वी मोटरहाक्याबरोबर पळून गेली होती; जाताना वत्सला म्हणत होती कीं, आम्ही आज मस्त मजा करणार; रात्रींच्या

अंधारांत अनेक गावगुंड भटकत असतात....अनेक आवाज आकांत करूं लागले.

बाईला वाटलें, ओरडावें. नवऱ्याला उठवावें. पोलिसात वर्दी द्यावी. देवापुढें डोकें फोडावे. पण तेवढ्यात मोटर वाजली नि वत्सला बागडत आली.

बाईचा जीव भांड्यात पडला. तिनें थपथपलेला घाम पुसला, दाराची पळी काढली. देवापुढें डोकें टेकलें, अन् दुरून दबकत ती वच्छीकडे पाहूं लागली.

वत्सला भावंडाना नि वडिलाना सागत होती, "वाटेंत मोटार पंक्चर झाली नि खोळंबा झाला. पण आम्हीं पोरींनीं खूप मजा केली. मोटारमध्यें बसून सारीं भोंडल्याचीं गाणीं म्हटलीं. अन् नाना, कुसुमच्या भावानें सुंदर भावगीतं म्हटलीं. अन् आमच्या मास्तरनीं झाडावर चढून कैऱ्या काढल्या. मोठ्या बाई तर—"

लाडिकपणे नि भाबडेपणानें ती सागत होती अन् बाईचें हृदय हेलावत होतें. बाईच्या भाजलेल्या मनाला मग्रूर मोटार ड्रायव्हर, थिल्लर भावगीतें नि उष्टावलेल्या कैऱ्या सारख्या तापवीत होत्या, अन् तिच्या पेटलेल्या डोळ्यांना वच्छीचे गाल, ओठ, बुबुळें नि बोलणें जाळीत होतें......

× × ×

मध्यरात्र होऊन गेली होती नि सारें शांत, शून्य झाले होते. फक्त घोरण्याचे घूत्कार सुरू होते नि स्वप्नाची गस्त चालू होती. बसंता तोंडांत आगठा अडकवून झोपला होता. वत्सलेनें डोक्यावर पाघरूण घेतलें होतें. नाना झोपेंत पुटपुटत होता. बाबा मोठ्यानें घोरत होते नि बाईला सारखीं स्वप्नें पडत होतीं.

आज दोनतीन महिने तिला अशीं स्वप्नें दिसत. विचित्र, वाईट, वेडीवाकडीं ! बाईला एकदम दिसलें कीं, वच्छी बेपत्ता झाली आहे, घरांतून नाहींशी झाली आहे, कुठें कुठें शोध लागत नाहीं तिचा...प्रभाकर जोशी नांवाच्या वारकऱ्याशीं वच्छी चोरून लग्न करते आहे नि हंसून लोक आपल्याच अंगावर अक्षता फेकताहेत...मागल्या दारानें कुणी मवाली घरांत कैऱ्या टाकत आहे अन् वच्छी त्या गोळा करीत भावगीत गात आहे... शेजारणी नि मास्तरणी आपल्या अंगावर थुंकताहेत, डाग देत आहेत...

नाना डॉक्टरच्या पोशाखात उभा आहे, स्वारीने हातात हंटर घेतला आहे अन् वत्सला ढसढसा रडत पाया पडते आहे...

केवढ्यांदा किंकाळी फोडून बाई उठली ! तिच्या अंगाला दरदरून घाम फुटला. आपण जाग्या आहोंत, जाग्यावर आहोत, हे पाहायला तिने दिवा लावला. वत्सला अंथरुणावर आहे कीं नाहीं तेंहि कटाक्षाने पाहिले. तेवढ्यात उठलेले बाबा बायकोला म्हणाले,

“ काय झालं गऽ? केवढयादा दचकलीस. स्वप्न पडलं वाटतं ? वेडीच आहेस—”

बाईनें पाण्याचे घोट घेतले अन् पतिराजांकडे रागावून पाहिलें. साऱ्या घराला आग लागायची पाळी आली आहे अन् हे खुशाल झोपा काढत आहेत ! कमाल आहे पुरुषाची—

बाईला दिवा मालवायचे भय वाटलें. ती तशीच अंथरुणावर आडवी झाली. पण झोप येईना. हल्लीं कित्येक दिवस झोप येईनाशी झाली होती. सारखा धसका वाटे. भीति वाटे. उरावरची धोंड झोंपेंत सुद्धां विसरणें कठीण होते. घरात जिवंत आग असताना डोळे मिटणे अशक्य होतें.

उघडया डोळ्यापुढे अनेक दृश्ये बाईला दिसूं लागली. हीं भुतें दूर कशी करावीं, कळेना तिला ! पुन्हा ती गुदमरली, ओरडूं लागली. बाबा पुन्हा उठून म्हणाले,

“ काय होतय ग ऽ ? ”

बाई उठून बसली. अवसान आणून म्हणाली, “ काय होतंय् काय ! झोप येत नाही मला. तुम्ही कुंभकर्ण आहांत नुसते. अन् भोळे सांबहि. कसं समजत नाहीं तुम्हाला ? वत्सला मोठी झाली. लग्नाची झाली—”

बाबाना हंसू लोटलें, पण बाईच्या मुद्रेवरील चीड पाहून ते मूक झाले. बाई दगडासारखी होऊन म्हणाली,

“ ही वाढलेली, वयात आलेली मुलगी, किती जपावी लागते, ह्याची तुम्हा पुरुषाना कल्पना नाहीं. चोवीस तास माझ्या डोळ्याचा पहारा आहे नि हुकुमाचा लगाम आहे. पण ही उरावरची धोंड कुठवर सांभाळायची ?—”

बाबा तिला अडवून आश्चर्यानें म्हणाले,

" म्हणतेस तरी काय तूं ? वच्छी इतकी लहान, भाबडी, गरीब—"

" सगळ्याच मुली भाबड्या नि गरीब असतात. पण मुलींचं वय त्याना स्वस्थ बसूं देत नाहीं, नि आयाचं मन—तुम्हाला नाहीं कळायचें तें !— मी म्हणते, वच्छीचं ह्या मोसमात लग्न उरकून टाकायचं ! काही व्हायच्या आत धडपणीं जाऊं दे घरातून धिडका—"

बाबाचा विस्मय ओसरला नव्हता. पण बाईचा निर्धारहि कायम होता. अखेर बाबा म्हणाले,

" मला वाटलं होतं की वच्छी अजून लहान आहे, अन् तिने खूप शिकावं. बरं, तूं म्हणतेस तसं होऊं दे—"

बाईला एकदम समाधान वाटलें. खूपखूप आनंद झाला. तिने आर्जवा केल्या, शपथा घातल्या, धमक्या दिल्या, अन् उद्यापासूनच वरसंशोधन करायचें पतिराजाकडून कबूल करून घेतलें. वत्सला इतकी हुशार व सुरेख होती, लग्न ठरायला काय उशीर ? एका आठवड्यात सार नक्की ठरेल. महिन्याभरात येणाऱ्या पहिल्या मुहूर्तावर लग्न उरकून जिकडचं तिकडे—

पतिराज घोरूं लागले, तरी बाई उघड्या डोळ्यापुढे स्वप्ने पाहत होती. त्याच तालात ती वत्सला निजली होती तिथें आली. अस्ताव्यस्त पसरलेल्या उफाड्याच्या पोरीला पाहताच बाईचें मन वात्सल्याने भरून आलें. ममतेने तिच्या अंगावरून हात फिरवीत ती तिथेच आडवी झाली. तिचें तप्त डोकें थंडावूं लागलें, नि मनावरचें दडपण हलके होऊं लागलें. चोहोंकडून उठलेले रान शांत होऊं लागलें—अन् नीट रस्ता दिसूं लागला. वच्छीचें आता लग्न होणार, आपल्या नवऱ्याकडे ती जाणार, धडपणीं, वरच्या मानेने जाणार ! तिचें माना वेळावणें, गाणीं गुणगुणणें, पदर सावरणें कमी होत जाणार, तिला मुले होणार अन् उडाणटप्पू लोक तिच्याकडे दुर्लक्ष करणार. बहरात आलेलें तिचें तारुण्य झपाट्यानें ओसरत जाणार अन् शांत पोक्त बायासारखी ती निरुपद्रवी नि निर्दोष होणार......

• • •

## आश्चर्य : : ६

'आश्चर्य आहे!' विनू स्वतःशींच पुटपुटला अन् तसाच आराम-खुर्चींत अवघडून बसून राहिला. दुपारचं जेवण झाल्यापासून तो असा तीन एक तास खुर्चीत पडून होता. आणि दर दहा पधरा मिनिटानी जाभईऐवजीं 'आश्चर्य आहे' असा उद्‌गार त्याच्या ओठातून घरंगळत होता. हातातला अडकित्ता नि सुपारी तशीच राहिली होती अन् तो नुसताच हात चोळीत होता नि ओठाचा चंबू करीत होता. त्याचे डोळे मधूनच बारीक होत, मध्येंच त्याच्या कपाळाला आठ्या पडत, त्याच्या तोंडावर हंसूं फुटे, तो कावरीबावरी हालचाल करी. त्याला दुःख झाले होते, सताप आला होता, पण त्यापेक्षां विलक्षण विस्मयानें त्याचें मन व्यापून गेलें होतें.

त्याला काही समजेनासेंच झालें होतें. यमू जोशीशीं लग्न करावयाचा बेत त्याने जाहीर केला तेव्हा त्याचे हृदय गोड हुरहुरीने भरले होतें. आपलें गुपित घरी कळेल तेव्हा आईला आनंद होईल, अगर वडील विरोध करतील घरचे लोक थक्क होतील, किंवा खूप रागावतील, असे त्याला वाटले होतें. तशी अनेक चित्रें त्याच्या डोळ्यापुढें रगून गेलेलीं होती. उदाहरणार्थ, मुली पाहायला मिळालें नाहीं म्हणून बहिणी रुसल्या आहेत, मोठपणाचा मान मिळाला नाहीं म्हणून आई रागावली आहे, परस्पर लग्न ठरवण्याचा उद्योग केला म्हणून वडील संतापले आहेत, आपण दाखवलेल्या धाडसामुळें घरचे सारे लोक भडकले आहेत, किंवा—किंवा असे कीं आईला सून येणार म्हणून सुचेनासें झालेंय्, बहिणी नाचायला लागल्या आहेत, वडिलाची आनंदानें

संमति मिळाली आहे, एकंदर घरभरच आपलें कौतुक चालू आहे, अन् आपल्यापेक्षा यमूची जास्त स्तुति सुरू आहे...

पण आज सकाळीं त्यानें आपला बेत जाहीर केला तेव्हा कुणी खुललेहि नाहीं नि रागावलेहि नाहीं. त्याची कुणी दृष्ट काढली नाही अगर त्याला कुणी टाकून बोललं नाहीं. त्याच्या आनंदाच्या बातमीनें सारे आनंदित झाले, पण त्याची पसंती कुणालाच पसंत पडली नाहीं. विनूचा विवाह होणार, पण पण तो यमूशीं...?

'कमाल आहे, आश्चर्य आहे !...' विनू स्वतःशीं म्हणाला अन् घरच्या मंडळीच्या वागण्याचें आश्चर्य करूं लागला. यमूची निवड कुणालाच आवडली नव्हती. तसे कुणी त्याला तोडावर उघड बोलले नव्हते. पण त्याला तें दिसलें होते, समजले होते. डोळ्यातल्या आश्चर्याच्या भावावरून, चेहऱ्यावरच्या निराशेच्या चलबिचलीवरून, पाठीमागे झालेल्या उपरोधिक कुजबुजीवरून त्याला ते पुरेपूर पटले होते. यमू कुणालाच आवडली नव्हती. सून म्हणून, वहिनी म्हणून, विनूची बायको म्हणून कुणाच्या कल्पनेत ती बसत नव्हती. ह्याला काय आवडली ती यमू ? एवढे काय पाहिले तिच्यात? —असेच सर्वांना कोडे पडले होते. अन् त्यामुळें विनू बुचकळ्यात पडला होता.

सकाळीं त्याने आईला एकीकडे ही बातमी सांगितली. आईने ओत्सुक्याने ऐकून घेतले. पण यमूबद्दल अधिक जिव्हाळ्याने ती बोलली नाही. तेव्हाच विनूला कांहीतरी चुकल्यासारखे वाटलें. नंतर बाबांशी बोलताना ती म्हणत होती, 'जाऊं दे ना ! त्याला आवडली आहे तर...' तेव्हा त्याला वडिलांच्या व आईच्याहि प्रतिक्रियेची कल्पना आली. मोठ्या वहिणीने, कळले तेव्हा छद्मी हास्य केले व धाकटीने बातमी कळलीच नाही असे वर्तन ठेवलें. जेवताना तर कहरच झाला. मामा नि मामी आल्या होत्या व प्रेमविवाहातल्या गंमतीवर गप्पा झोडल्या गेल्या होत्या. विनूला त्यात मुळींच भाग घेता येईना, इतके त्याच्या मताविरुद्ध इतरांचे विचार प्रकट होत होते.

जेवणानंतर तो कसाबसा खुर्चीत टेकला. आतुरता, आवेग केव्हाच संपला होता. हलुहळू दुःख नि चीडहि कमी झाली, अन् नुसत्या विस्मयानें तो सुन्न होऊन पडला. कां नाही यमू आवडली कुणाला? काय कमी आहे तिच्यात?–त्यालाच कोडे पडले इतराच्या विचाराचें! लावण्यवती नसली तरी दहा जणींसारखे रूप आहे तिचें. अन् आकर्षक तर आहेच आहे! विशेष शिकलेली नसली तरी अशिक्षित नाही. उलट हुषार आहे! एखादा खास गुण, खास कला जवळ नसली तरी गोड स्वभाव, अभिजात रसिकता –तिच्यासारखी मुलगी त्रिभुवनात मिळणार नव्हती. पण मग त्याच्याखेरीज सर्वांनाच सामान्य कां वाटली होती ती? विरोध केला असता तर चालले असतें, पण असा निरुत्साह का दाखवावा?

'गंमत आहे'–विनू स्वताशी पुटपुटला अन् टेबलावर ठेवलेल्या यमूच्या फोटोकडे पाहू लागला. खरेच, किती गोड, लाघवी, आकर्षक होती! आपली पत्नी शोभेल अशीच अनुरूप! अन् ह्या घरात सामावून जाईल अशीहि. पण मग...

विनूच्या डोक्यातला गोंधळ क्षणाक्षणाला वाढत होता. रविवारचें जादा प्रमाणात जेवण झाल्यावर सुपारी चघळीत कादंबरी चाळीत लोळायचे, थोडा वेळ झोंप ताणून मग मित्राच्याकडे पत्ते झोडायला जायचे अन् तसेच एखादे इंग्रजी पिक्चर पाहून उशीरा घरी परतायचें हा नेहमींचा कार्यक्रम आज आठवत सुद्धा नव्हता. दोन तीन तास खुर्चीत बसून तो लोकाच्या वर्तनाचा विस्मय करीत होता. अन् इतका वेळ विचार करूनहि त्याला उलगडा होत नव्हता.

हळुहळूं त्याला इतर लोकाच्या उद्याच्या प्रतिक्रियाहि दिसूं लागल्या. शेजारणी आईला म्हणत होत्या, इश्श्य, हीच का सून पत्करलीत! चांगली मोठ्या घरातली मुलगी सहज मिळाली असती तुम्हाला!–वहिणी आपल्या मैत्रिणींना सागत होत्या, माझी किती इच्छा होती तूं दादाशीं लग्न करावं म्हणून; पण तें ध्यान काय आवडलं त्याला कोण जाणे!–अन् मित्र तर चक्क तोंडावर बोलत होते, लेका! प्रेम करायचं तर एखाद्या सुंदरीवर तरी करायचंस. निदान श्रीमंताची एकुलती एक लेक तरी

गठवायचीस. तूं भावगीतं लिहितोस अन् तिचा तर आवाज सुद्धां घोगरा• अन् नांव सुद्धा कसलं कळकट !–

विनूचें हृदय अगदी कासावीस झालें. एखाद्या कुरूप, बावळट, वेडसर मुलीचे वर्णन दिलें जात होतें यमूला !–ती अशी मुळीच नव्हती, उलट आजूबाजूच्या कुठल्याहि मुलीहून सर्वदृष्ट्या वरचढ होती. विनूनें हतबल झालेलें हृदय सावरलें. इतराच्या बोलण्याशीं त्याला काय कर्तव्य होतें ? चार दिवस टीका होईल, अन् मग सारे चूप बसतील. तिच्याशी विनूला संसार करायचा होता. अन् त्याला ती आवडली होती. मग इतर विचार कशाला !–

विनूनें स्वतःची समजूत घातली. अन् त्यातूनहि सलणारें शल्य नाहींसें करण्याकरिता तो यमूच्या फोटोकडे पाहूं लागला. आपलेपणानें, अभिमानानें ! किती शांत, प्रसन्न चेहरा, किती आवर्जून, आत्मीयतेनें विनूकडेच पहात होते ते डोळे. तें चित्र मोठें मोठें होत विनूच्या अगदीं नजीक येऊं लागलें...

" इश्श्य–बसला आहेस काय नुसता ?–चहा नाहीं का घ्यायचा ?–रोज तीन वाजले कीं चहासाठीं कासावीस होतोस–ऊठ ! " आई त्याच्या पुढ्यांत येत त्याला म्हणत होती. आईचा चेहरा पाहताच विनू गोंधळून गडबडून उठला. त्याच्या हातुन पडलेला अडकित्ता कोनाडयात ठेवून आई आंत घरांत गेली. विनू वेडयासारखा पहात राहिला. चेहऱ्यावरची प्रसन्नता, दृष्टींतला आपलेपणा–त्याला वाटलें होतें, यमूचाच फोटो मोठा होत त्याच्या समोर येत आहे. पण आई त्याला चहाला बोलवत होती !

स्टोव्हच्या आवाजांत, चहावरील वाफेवर विनूचा संग्राम पुन्हा सुरू झाला. निदान आईला तरी यमू आवडायला हवी होती ! कां नाहीं तिला आवडली यमू ?–अन् आपल्याला आवडली, ह्याचें तिला आश्चर्य कां वाटलें ? का आपल्याला आवडली यमू ?—

तो चहाचा कप संपवून बाहेर आला अन् अडकित्ता घेऊन परत खुर्चींत बसला. आता निराळाच गोंधळ त्याच्या मनात गुंता करूं लागला. यमू सर्वांना कां आवडली नाहीं या ऐवजीं आपल्याला कां आवडली हा प्रश्न त्याला भंडावूं लागला. इतरांचा संभ्रम आतां त्याला सतावूं लागला.

फोटोकडे न पाहतां तो तिचें रूप पाहूं लागला. हंसरी जिव्हणी, डाव्या कानाखालचा तीळ, कुरळेपणा,—सारें त्याला स्पष्ट दिसूं लागलें. तिचें हसणें, रुसणें, आसासून बोलणें, विश्वासानें वचन देणें, पुन्हां एकवार त्याला ऐकूं आलें. तिची पहिली भेट, तिच्या स्पर्शांतली संवेदना, तिच्या प्रेमांतली भव्यता—ती त्याला आवडली होती, ती त्याचीच होती! पण तरीसुद्धां ती कां आवडली त्याला? तीच कां आवडली?—शेजारची सुशी, बहिणीची मैत्रीण मोहनतारा, कविता करणारी कमल, आईच्या नात्यांतली नि लवकरच सांगून येणारी मंदाकिनी...यमूच कां आवडली?

खुर्चींत बसणें आतां अशक्य झालें. अडकित्ता टाकून तो उठला. नि येरझाऱ्या घालूं लागला. यमूखेरीज जगणें अशक्य आहे, तिच्याशिवाय इतर कुणा स्त्रीबद्दल प्रेमभावना वाटणार नाहीं, इत्यादि सर्व दिव्य भव्य गोष्टी सत्य आहेत, ह्यात संदेह नव्हता. पण सर्व मुलींतून नेमकी यमूच कशी हृदयांत शिरूं शकली, कुठल्या कारणानें तिच्यावर प्रेम जडलें, ह्या सोप्या समस्येचा त्यालाच उलगडा होईनासा झाला.

'आश्चर्य आहे–' विनू पुटपुटला अन् थाबला. खुर्चींत अवघडत बसून अगर खोलींत येरझारा घालून मनांतला गोंधळ कमी होत नव्हता. विनूनें कोट चढवला, सायकल बाहेर काढली, अन् तो घराबाहेर पडला.

घरासमोरच्या माडीवर सुशी उभी होती; अन् रस्त्यावरून जाणाऱ्या वेणीवाल्याशीं बोलत होती. सुशीला पाहतांच विनू सायकलवर बसतांना धडपडला. कसाबसा सायकल पिटाळत दुसऱ्या दिशेकडे पाहात तो निघाला. सुशी त्याची बालमैत्रीण होती. लहानपणीं दोघेंजणें खेळलीं होतीं. भांडलीं होतीं. कित्येक वर्षं रोज घराबाहेर विनू सायकल काढीत असे, तेव्हां समोरच्या माडींत उभी राहून सुशी त्याच्याशीं बोले, हंसे!...यमूशीं लग्न करणार हें तिला कळलें कीं, ती पण नाक मुरडणार? आपल्या बालमैत्रिणीला आपली भावी पत्नी पसंत नाहीं पडणार?——

...मग काय आपण सुशीशी लग्न करायला हवें होतें?– खूप सुंदर आहे म्हणून? आपली बालमैत्रीण आहे म्हणून? विनूला हंसूं लोटलें. भातुकलींत नवरा झालों म्हणून आतां खराखुरा पती व्हायचें कीं काय?

सुशीची लहानपणापासून ओळख आहे तर यमू मागल्या जन्मापासून आपली आहे...

दोन वर्षापूर्वी यमूची ओळख झाली तो प्रसंग त्याला आठवला. तिच्या वाड्यात त्याचा एक मित्र रहायला गेला होता. रस्त्यावर सायकल थाबवून त्याने जोशाचा वाडा कुठला म्हणून चवकशी केली तेव्हा एक चुणचुणीत तरुणी माडीवरून डोकावली. धावत आल्याने हालणारे तिचे वक्षःस्थळ सज्जाच्या कठड्याला रेलल्यामुळे दबलें गेले होते. ती म्हणाली, "इथेच!"–तो दिडी दरवाजातून आत गेला. दबलेल्या वक्षःस्थलातून तिच्या हृदयात शिरला...

विनू वेगाने सायकल पिटाळत होता. अन् त्याच्या दृष्टीसमोर जोशांच्या माडीवरून वाकून पहाणारी यमू दिसत होती. त्या दिवशी क्षणभरच ती तशी उभी राहिली, पण ती मूर्ती विनूच्या हृदयात कायमची कोरली गेली. ती दिसली, ती तशी दिसली, अन् त्याला प्रीतीचा साक्षात्कार झाला. त्याच्या हृदयाला तिने साथ दिली अन् दोघे वचनबद्ध झाली. दोन वर्षे झाली, पण अजूनहि प्रीतीच्या जाणीवेसरशी ती प्रथम भेट विनूला स्पष्ट आठवे. आत्तासुद्धा भर बाजारातून सायकलवरून जाताना त्याला तिची आकृति तशीच दिसत होती.

पण ती आकृति का आवडली आपल्याला?–त्या दिवशी का एकदम भांबावलो? अन् मग एकसारखी हुरहूर का वाटू लागली?– विनूनें सायकलचा वेग कमी केला. एका हाताने खिशातला रुमाल काढून कपाळा-वरचा घाम पुसला. अन् बाजारचा रस्ता सोडून तो कॉलेजच्या दिशेकडे वळला. सज्जात यमू दिसली म्हणून आवडली? सुशी तर काय बारा वर्षे सज्जात सकाळ–संध्याकाळ उभी राहून आपल्याशीं बोलते!–यमूच कां आवडली!–आईला ह्याचेच नवल वाटलें. बहिणीनाहि तेच कुतूहल वाटत आहे, सुशीलाहि तीच शंका येणार! अन् आपल्यालाहि–खरेच, का आवडली यमू आपल्याला?—विनूचा विलक्षण गोंधळ उडाला. रस्त्यावरचे खड्डे व गर्दी; डोक्यातला गोंधळ नि गुंता!–त्याला काहीच कळेना. तो मोठ्यानें नकळत म्हणाला, 'आश्चर्य आहे!'

सिनेमागृहापाशीं गर्दी होती म्हणून विनू सायकलवरून उतरला. दुपारचा खेळ सुटला होता अन् लोक बाहेर पडले होते. रस्त्याच्या कडेला सायकल घेऊन विनू थांबला. त्याच्या जवळून अनेक स्त्रिया गेल्या. खूपशा तरुण मुलीहि त्यात होत्या. सुंदर, श्रीमंत, नटलेल्या, नजर खिळवणाऱ्या. पण कुठल्याहि स्त्रीजवळ, यमूजवळ आहे तें नव्हते ! काय होतें यमूजवळ ? का आवडली यमू एवढी ?—

अनेक तऱ्हेच्या तरुणींना पाहून विनूला आपल्या निवडीबद्दल समाधान वाटले खरें; म्हणूनच त्याचे रहस्य त्यालाच अधिक अज्ञात झाले. बोचूं लागले.

गर्दीचा जोर ओसरल्यावर विनू हमरस्त्यावर आला. सिनेमागृहासमोर लावलेली चालू चित्रपटाची प्रचंड जाहिरात त्याच्या नजरेसमोर आली. मिस् मधुमालाचे चित्र आज बरेच वर्षांनीं लागलें होते. मधुमालेच्या मोठ्या चित्राकडे विनू पाहूं लागला. कॉलेजात असताना ह्याच नटीने त्याला वेड लावलें होते. मधुमालेचे प्रत्येक पिक्चर तो पुन्हा पुन्हा पाही. तिच्या अभिनयाने नि तिच्या सौंदर्याने तो मोहून गेला होता. इतर तरुणाप्रमाणे त्यानेहि तिचे अनेक फोटो जमवले होते. काहीं ट्रंकेत, काहीं पुस्तकात, एकतर टेबलावरहि ठेवला होता. तारुण्यातली ती त्याच्या स्वप्नाळू मनाची आराध्यदेवता बनली होती. प्रेम करावे तर अशा अप्सरेशीं—

मधुमालेच्या फोटोकडे पहाताच विनूला तो सारा खुळेपणा आठवला. अन् हंसूं लोटले. वयात आल्यावर वाटूं लागणारें वेड; अलभ्य वस्तूसाठीं झेप घेणारी वृत्ति. आता मधुमालेची आठवणहि उरली नव्हती त्याला ! तिचे चित्र लागले आहे हेंहि त्याला ठाऊक नव्हते. तिचे जवळचे फोटोहि कुठे गहाळ झाले होते. टेबलावरचा बरेच दिवस होता, पण त्या जागीं आता यमूचा फोटो विराजूं लागला होता.

मिस् मधुमाला अन् यमू जोशी. काय साम्य असणार दोघींत ?— समोरच्या चित्रातल्या सौंदर्याचा शतांशहि यमूंत नव्हता. अन् तरीहि आज ती अधिक आकर्षक वाटते. मधुमालेच्या मोहाबद्दल आता आपलीच कींव येते. यमूने कसली भरळ पाडली आपल्याला ? का आपण यमूला पसंत.

केली !—विनू वेड्यासारखा मधुमालेच्या चित्राकडे पाहूं लागला. पूर्वी एकांतात तिचा फोटो जवळ घेऊन तो निरखून पाहात बसे. आज रस्त्यावर उभे राहून तो तिचें भिंतीवरील भडक चित्र कसाबसा पाहात होता. तिचा गोंडस नाजूक चेहरा, कपोलाजवळची लाली. डाव्या कानाखालचा तीळ. कांहीं काळ तो तीळच त्याला दिसत राहिला. नुसता निळ्या रंगाचा ठिपका दिलेला तीळ !

तो एकाएकीं भानावर आला. रस्त्यावर आपण एकटेच उभे आहोंत हें ध्यानात येऊन त्याला स्वतःची शरम वाटली. सायकल ढकलीत तो पुढें झाला, केव्हांतरी सायकलवर बसला अन् कुठल्या तरी रस्त्यानें निघाला. ओळखीचाच रस्ता होता, पण आपण कुठून चाललों आहोंत ह्याची विनूला नक्की जाणीव नव्हती. यमू आपल्याला का आवडली हें त्याला शोधून काढायचें होते व तें सांपडेलसेंहि वाटत नव्हते. म्हणूनच त्याचा गोंधळ वाढला होता. अन् ओळखीच्या वाटेनें तो आंधळ्यासारखा उगाचच भटकत होता.

तो कितीतरी वेळ चालला होता. दोन वर्षे तो प्रेम करीत होता अन् त्या काळातल्या साऱ्या खुणा त्याला स्मरत होत्या. पाहली ओळख, पहिलें पत्र, पहिली सहल—अन् रोजची हुरहूर, रोजच्या शपथा !—पण यमू आवडलीच का हें कळत नव्हतें. लोकांना वाटणारा वेडा प्रश्न आतां त्यालाच सुटत नव्हता. हा प्रश्नच अप्रस्तुत आहे असें एकवार वाटे, अन् मध्येंच अवघड कोड्यानें त्याचे हृदय फाटून निघे. एकदां वाटे, उत्तर हृदयांतच अगदीं जवळ आहे; अन् तरीहि क्षितिजापलीकडून हुडकून आणण्याइतकं अशक्य वाटे.

कॉलेजजवळ टेकडीशीं तो पोंचला. संध्याकाळ झाली होती नि संथ वारेहि सुटूं लागले होते. सायकल खालीच ठेवून तो टेकडीवर चढला. इकडे तिकडे हिंडत तो उंचावरच्या एका कातळावर बसला. आजूबाजूला बरेंच शात होतें. दूरवरचें कॉलेजचें पटागण स्पष्ट दिसत होतें. त्या मागची कॉलेजची इमारत, तें सभागृह, त्याच्या बाजूचा इंग्रजीचा वर्ग...

विनूला कॉलेजचे दिवस आठवले. इंग्रजीच्या तासाला तो त्या वर्गात खिडकीशीं बसत असे. कितीतरी दिवस झाले त्या गोष्टीला. इंग्रजीचे प्रोफेसर ब्राउनिंगचें काव्य शिकवीत. त्याच्या रसाळ वाणीतून ब्राऊनिंगच्या प्रेमगीतांचा अर्थ उलगडू लागला की सारे विद्यार्थी मंत्रमुग्ध होत. त्या काव्याने व त्या शिकवण्याने कविता करायचा छंद जडला. अन्–अन् खुद्द तास चालू असला कीं, समोर कवितेच्या ओळी सरकूं लागत अन् त्या झिरझिरीत पडद्यातून दूरवर दिसणारी टेकडी नजरेपुढे नाचूं लागे. विशाल आकाशानें मिठींत घरलेली नुक्तीच वयांत आलेली ती टेकडी. त्या टेकडीवर ब्राऊनिंगच्या प्रेयसीसारखी एक अस्पष्ट आकृति उमटू लागे. गोड, गोडस, धूसर, धावती ! बालिश पण प्रेमळ. कुरळ्या केसाची, पण प्रशात चेहऱ्याची. स्वप्नातली, पण स्पष्ट दिसणारी.

टेकडीवर बसून विनू आज कितीतरी दिवसानी त्या वर्गाची ती खिडकी पाहायचा यत्न करीत होता. कितीतरी दिवसानीं त्याला ते दृश्य आठवलें होतें. काव्यानें भारलेला तो विनू, ब्राउनिंगच्या कवितेनें मुरलीसारखी भरलेली जादू, त्या तरुण मनाच्या स्वप्नाळू डोळ्याना दिसणारी ती प्रेयसी—कुठे गेली ती कल्पना, कुठे गेली ती आकृति ! ह्या कातळावर तो यमूला घेऊन आला होता. इथेच त्याच्या आणाभाका झाल्या. काय झाले सारें ?–ब्राउनिंगच्या काव्यपंक्तीनें उजळलेली ती स्वप्नमूर्ती कुठे विरली ?–अन् ही यमू जोशी नावाची आपण लिहिलेलीं भावगीतें सुद्धा गाऊं न शकणारी मुलगी कशी प्रकटली—? का आवडली यमू ?

टेकडीवर डोकें धरून तो एकटाच बसला होता अन् इमारतींतल्या खिडकीकडे भाबावून पहात होता. खिडकीच्या गजाआड अडकलेल्या कॉलेजकुमार विनूने यमू भेटायच्या कितीतरी आधीं ती मूर्ति टेकडीवर स्पष्ट पाहिली होती. आज तो विनू मोठा झाला होता, टेकडीवर येऊन पोंचला होता, यमू त्याच्या हृदयांत कायमची कोरली होती. अन् त्या स्वप्नाळू वयातल्या काव्यकल्पनेशीं साम्य शोधण्याचा यत्न करीत आता हा संभ्रमांत सापडला होता. काय केलें आपण ?–यमू एवढी का आवडली ?–काय दिसलें तिच्यांत ?

कातळावरची संध्याकाळ विनूला सतावू लागली. त्या एकांताचा त्याला त्रास होऊं लागला. खुर्चींत अवघडून बसल्यासारखें ह्या मोकाट मोकळ्या जागी त्याला वाटूं लागलें. मनांतली शंका घड्याळाच्या टिकटिकीसारखी दंश करू लागली. दुःख अन् संताप ह्याच्या सीमा न सोडता त्याच्या प्रश्नाचा प्रवाह सारखा पुढे जात राहिला.

अखेर तो तेथून उठला. खाली उतरून त्याने सायकल उचलली व तो सायकलवर चढला. पुन्हा ओळखीच्या रस्त्यानें अनोळखी इसमासारखा तो जाऊं लागला. त्याच रस्त्यानें पुन्हा पुन्हा तो भटकत राहिला. जी यमू त्याचीच आहे, जिच्यावर तो सारें आयुष्य ओवाळून टाकायला सिद्ध झाला आहे, जिच्या प्रेमाची त्याला साक्ष पटली आहे, ती कां आवडली ही साधी समस्या त्यालाच सुटत नव्हती. इतराचा मग काय दोष? श्रीमंती, सौंदर्य, विद्वत्ता, कलागुण ह्याच कसोटीनें सारे पहाणार. अन् हें सारे सामान्य असलें तर त्यानाहि आश्चर्य वाटणार, प्रश्न पडणार!—पण आपल्याला? तिच्याजवळ काही असामान्य नसूनहि ती आपल्याला आवडली, आपली वाटली. जणू कांहीं जन्मोजन्मींची सोबतीण आहेसें भासलें. पहिल्या भेटींत ओळख पटली नि हृदयाची गाठ बसली. पण हें सारें काय आहे? का आवडली ती? कां हे सारे भास झाले?—

विनू विलक्षण गागरला. त्याचें आश्चर्य अधिकाधिक वाढू लागले अन् त्याचे पाय यमूच्या घराकडे वळले. सायकल दारात ठेवून तो घरांत आला. यमू घरांत आहे असे कळल्यावर त्याच्या छातीत धडधडलें. तो आंत घरात गेला. स्टोव्ह पेटविण्यांत यमू गुंतली होती. तिला तशी ओझरती पाहतांच विनूला अचानक आईची आठवण झाली! आईला का कांहीं आवडली ही? - पण आपल्यालाच का आवडली ही? त्याला अगदीं उमजेना. यमूच्या सान्निध्यांत हें कोडें सुटलेसें वाटलें होतें. पण यमूभोवतीं प्रशांत चेहऱ्याची आई, सज्जांतून सदैव बडबडणारी बालिश सशी, निळ्या तिळाची मादक मधुमाला, कॉलेजच्या कातळावर अवतरलेली काव्यमूर्ति—साऱ्या फेर धरून तोच सवाल करीत होत्या, कां आवडली यमू?—

तेवढयांत यम्‌ने त्याच्याकडे पाहिलें व मोहक हास्य केलें. संध्याकाळच्या सावल्यामुळें तिची काया धुसर भासत होती. अन्‌ स्टोव्हच्या लालसर उजेडानें तिचा मुखडा उजळून निघाला होता. हीच हृदयाची राणी. हीच जन्मोजन्मींची जोडीदारीण. पण–पण–आपल्या प्रेयसीकडे पाहात विनू विस्मयानें विलक्षण व्याकुळ होऊन कसाबसा बाजूच्या खुर्चीत बसला...



## करुणा : ७

अरुणा कितीतरी वेळ निश्चल उभी होती. थरथरणाऱ्या जिव्हणीची रेषा वक्र होत होती, अन् रुदावलेल्या डोळ्याच्या कडा पाण्यानें भरत होत्या. मग एकाएकीं ती आवेगाने उद्गारली, "नाना, तुम्ही सारे जा पुण्याला ! मी नाहीं येत. मी राहीन इथे एकटी—"

नाना हातातल्या होल्डॉलचा घट्ट पट्टा सैल सोडून प्रश्नांकित मुद्रेने अरुणेकडे पाहू लागले. आईला, मधूला, बेबीला—साऱ्यानाच विलक्षण आश्चर्य वाटलें. फिरकीचा तांब्या, लुगड्यांच्या घड्या, भरलेल्या ट्रंका, पोत्यातील भांडीं—सारें सामान तसेंच टाकून सर्वजण अरुणेकडे पाहूं लागले.

अरुणेला ह्याची अर्धवट जाणीव होती. आपण वेड्यासारखें बोलत आहोंत हें तिच्यासारख्या पंधरा-सोळा वर्षांच्या मुलीला समजत होते. तरीपण तिच्या मनाचा निश्चय झाला होता. हे दिव्य तिला करायलाच हवें होतें. तिनें नाहीं केले तर कसें होणार ?—नाना बोलायच्या आतच तिला उमाळा आला, अन् ती म्हणाली, "खरंच मी नाहीं येत-मी राहीन इथे—"

आई एकदम पुढें होऊन म्हणाली, "वेड लागलय् काय तुला ?—इथें कुठें राहणार अन् कशाला राहणार ?—सर्वांनींच जायचंय् आतां पुण्याला कायमचं !—अन् तूं कशाला इथें राहणार ?—"

नानाना तिच्या वागण्याचा अर्थ उमजला नाहीं. तरीहि ते हसले, नि म्हणाले, "दुपारपर्यंत तर नाचत होतीस जायचं म्हणून !...ऑ—खुळी कुठली—कांहींतरी डोक्यात घेऊन बसते !—सगळ्यांनीं जायचं आतां—

तिथें जागाहि छान मिळाली आहे. अन् केवढया मुष्किलीनी तुला हुजुर-पागेंत प्रवेश मिळाला आहे—"

अरुणेला उमाळे अनावर झाले. रडक्या स्वरात ती म्हणाली, "नको ती हुजुरपागा—आमची इथली शाळाच चागली आहे—नाहींतर काय हो, नाना?—मी इथनं गेले म्हणजे ह्या शाळेंत गॅदरिंगमध्यें गाणं हो कोण म्हणेल!—अन् माझ्या मैत्रिणींना कित्ती वाईट वाटलं आज मी जाणार म्हणून!—सुशी तर बिचारी उद्यापासून एकटी अभ्यास करणार—एकटी शाळेंत जाणार—"

आता नानाना उमजलें. पण न हसता ते म्हणाले, "असं-अस-! म्हणून तुम्हाला इथे राहायचय होय?—अग, पुण्याला लागेल तेवढ्या मिळतील कीं मैत्रिणी—जा, जाऊन झोप आता—दमली असशील—"

आईने एक सुस्कारा सोडून भितीवरच्या तसबिरी काढीत म्हटलें, "खालच्या खोल्यातून काहीं राहिलंय का बघून ये—नि मग झोप!" अरुणेला रडूं येईना. राग मात्र आला. आपली भावना कुणीच ओळखेना ह्याचा संताप आला. ती जिना उतरून ओटीवर आली अन् शून्यपणे उभी राहिली.

खरंच, तिला हें गांव, ही शाळा, हें घर सोडणे जिवावर आलें होतें. आपण गेल्यावर इथे काय दशा होईल! शाळेत मैत्रिणींना एकटे एकटे वाटेल. बिचाऱ्या पोरी!—एकेकीच्या आठवणीने अरुणेचा कंठ दाटून आला.

तसेंच हें घर नि ही बाग. सकाळीं मोगरीची फुलें कोण तोडणार?—दारापुढें रांगोळी कोण घालणार?—मी गेल्यावर किती उदास दिसेल सारें?—अरुणा घरभर खिन्नपणें पाहूं लागली. कोपऱ्यात बसलेली मांजरी पाहून तिला पुन्हा उमाळे आले. भाटीला कोण दूध घालील—अन् कोण सारखे लाड करीत बसेल? अरुणेनें मांजराला उचललें नि छातीशीं धरलें. डोळे मिटून ती स्वस्थ उभी राहणार तेवढ्यांत समोरून विसू आलेला तिला दिसला.

विसूला पाहताच अरुणेनें मांजराला ढकलून दिलें. विसू तिच्याकडे येत म्हणाला, "तयारी झाली सारी—?"

" बहुतेक–आई नि नाना वर बाधाबाध करताहेत–"

हातांतली हॉकी-स्टिक् ऐटीत फिरवीत विसू म्हणाला, " चैन आहे बुवा !–"

अत्यंत आश्चर्यचकित होऊन अरुणा म्हणाली, " चैन ? कसली ? "

" आता काय, तुम्ही पुणेकर होणार !—हुजुरपागेत जाणार–दोन वर्षांनी मॅट्रिक होऊन कॉलेजात–"

" मग त्यात चैन कसली ? तूंसुद्धा पुढल्या वर्षी होशील मॅट्रिक. अन् मला पुण्यापेक्षा इथेंच बरं वाटतं—"

" छत्—आत्तां म्हणते आहेस; तिकडे गेलीस की—"

" नाहीं रे, विसू,–मला तिथे करमायचं नाही. तुमची सर्वांची राहून-राहून आठवण येईल. मी गेल्यावर तुम्हांला कसं राहवेल रे एकटं ?—"

" त्यात काय आहे ? " विसू म्हणाला. तेवढ्यात नानांनी त्याला हाक मारली म्हणून तो घाईनें वर गेला.

विसू गेल्यावर अरुणेला ब्रह्मांड आठवले. किती प्रेमळ स्वभावाचा बालमित्र हा !—असा शेजारी शोधूनही सापडायचा नाही. अन् बिचाऱ्याला आता यायला आमचे घर नाहीं यापुढे. एकटा शाळेला, खेळायला जात जाईल, अन् एकटा राहील सारा दिवस !–

अरुणेला वाटले, पुन्हा एकदा जाऊन नानाना सागावें कीं, मी राहणार एकटी ! हे गाव, हे घर, हा विसू सोडून मला जगणें अगदीं अशक्य आहे.–

× × ×

अरुणा पुण्याला आली. नवे बिऱ्हाड नीट लागले. हुजुरपागेंत ती लवकरच रमून गेली. नवे गाव, नवें घर, नव्या मैत्रिणी–दिवस कसे जात होते ते कळतहि नव्हतें. अरुणा मोठी झाली. मॅट्रिक झाली. आई–नानाना अरुणेचें किती कौतुक करूं नि किती नको असें झालें होते. अरुणेला कॉलेजमध्यें किती बागडूं नि किती नको असें झालें होते—

कॉलेजमध्ये ती सर्वांना आवडे. मुलाना–अन् मुलींनासुद्धां !–कुरूप मुलीशींसुद्धा तिची मैत्री असे. अन् रद्दड प्रोफेसरच्या तासालासुद्धां ती मनःपूर्वक लक्ष देई.

तशातच तिच्याजवळ असलेला गाण्याचा गुण !—संमेलनाचा चिटणीस केशव काटदरे अरुणेला आग्रहानें म्हणाला, "मिस् सुखात्मे, तुम्हीं गॅदरिंगमध्यें भावगीतं म्हटली पाहिजेत. नाहींतर गॅदरिंग होणार नाहीं—"

अरुणेला खूप लाजल्यासारखें झालें. आपण गाणें म्हटलें नाहीं तर गॅदरिंगच होणार नाहीं ?—एवढी तयारी फुकट जाईल—अन् सारे हिरमुसले होतील ? अरुणेने तात्काळ संमति दिली.

पण मग सुधा शिरोळे तिला सांगू लागली, "काही ऐकूं नकोस त्या काटदरेचं ! एक नंबरचा लफंगा आहे. पोरींच्या पुढें पुढे करतो —!" अन् कुसुद रेगे नि सरल शिर्के तेच म्हणाल्या. कुणाहि मुलीचें त्याच्या-बद्दल चांगलें मत नव्हते. अरुणेच्या वाड्यातल्या बंडू साखरपाडेनेसुद्धा सुचवले, जरा जपून !

अरुणेला काय करावें कळेना ! ती गाण्याच्या तालमीला जात होती. नाहीं कसे म्हणायचे तेंच तिला कळेना. अन् केशव चांगला वागत असे. तिला खुर्ची मिळत असे. तबलेवाल्याला नीट वाजवायची ताकीद मिळे. एकदोनदा तर घसा साफ राहावा म्हणून अरुणेला सुंठेच्या वड्यादेखील दिल्यान् त्यानें !—

किती साधा नि चांगला होता केशव !—उगाच सारीं नावें ठेवतात बिचाऱ्याला—

अन् मग अरुणेने संमेलनात सुंदर भावगीतें म्हटलीं : "निरांजन पडलें तबकांत" अन् "तुजवीण सखे मज कोणी नसे."

सारींजण खूष झालीं. अन् केशवनें कृतज्ञतेनें अरुणेचे आभार मानले. अन् तिला छोटीशी फोटो-फ्रेम नजर केली.

दोघांचें एकमेकावर प्रेम जडलें होतें.

कॉलेजचा तास बुडवून टेकडीच्या माथ्यावर अरुणेची प्रेमयाचना करतांना केशव म्हणाला, "आपण पुढचं कांहीं ठरवण्यापूर्वीं मला कांहीं गोष्टी सांगायच्या आहेत तुला. तुला अंधारांत ठेवायची, फसवायची माझी इच्छा नाहीं. शुद्ध मनाने मी तुला सारं सांगतों. मला लोक 'लोफर' म्हणतात. मी मुलींशीं लबाडपणानं वागतों, त्यांना फसवतों—"

अरुणा त्याला अडवून म्हणाली, " मला ठाऊक आहे सारं–

केशव चकित होऊन तिच्याकडे पाहूं लागला. अरुणा अचलपणें म्हणाली, " मला ठाऊक आहे. सारं जग तुला शिव्या देतं–वाईट म्हणतं. कोणी तुला जवळ करीत नाहीं–आपलं म्हणत नाहीं. मला माहीत आहे. पण, केशव, जगानें तुला टाकले तरी मी आहे तुझ्याजवळ––! मी तुला असं एकाकी राहून देणार नाहीं. लोक नाही-नाही तें खोटंनाटं बोलतात. तुला काय वाटत असेल ह्याची त्यांना कल्पनासुद्धा होत नसेल––"

केशवचें आश्चर्य अजून उतरलें नव्हतें. अरुणेचे कोमल नि काळे डोळे इतके भारावलेले त्यानें पूर्वी पाहिले नव्हते. किती स्निग्धपणें ती पाहत होती अन् किती आत्मीयतेनें ती बोलत होती ! त्याच आवेगात ती केशवला बिलगून म्हणाली, " फार त्रास होतो ना रे तुला ! बिचारा–माझा–माझा केशव ! मी तुला सोडून नाही जायची ह कुठे––"

× × ×

केशवची कड घेऊन जगाशी सामना द्यायचा निर्धार केल्यापासून अरुणा अत्यंत आनंदात होती. घरच्या लोकाना कसलीहि गंधवार्ता नव्हती, तरी अरुणेला त्याची पर्वा नव्हती. ' सागूं कधीतरी–नाना नाही म्हणायचे नाहींत !–' त्याच तालात ती मैत्रिणीचीही उपेक्षा करी. कुणी कुत्सितपणें बोललेलें पाहिले की तिला अधिकच अवसान चढे, अन् आत्यंतिक अनुकंपेनें ती केशवला जास्तीच जवळ करी.

असेच दिवस गेले अन् एकदा ती अशीच केशवकडे निघाली. आपल्याच नादांत बसमधें बसली असता तिला एकानें चिमटा घेतला. आजुबाजूचे लोक गुरकावून त्या तरुणाच्या अंगावर आले. पण अरुणा म्हणाली, " छे–छे माझ्या ओळखीचा आहे हा. विश्वास वाटवे !–विसू !"

अन् मग ती विसूबरोबर बसमधून उतरली. विसूचा विनोदी स्वभाव कायम आहे हें तिला पुरेंपुरं पटलें होतें, अन् विसूवर सारे उतारू चढाई करून आले तेव्हां तो भेदरून आपल्याला बिलगला हें तिला राहून-राहून आठवत होतें.

फुटपाथवरच उभे राहून तिनें विचारलें, " किती दिवसांनीं भेटलास, विसू !–अन् इकडे कधीं आलास ?–"

" गेले दोन महिने आहे मी इथें—"

अरुणेला आश्चर्य वाटलें. फुटपाथच्या कडेला होत ती म्हणाली, " दोन महिने ?–अन् आमच्या घरी आला नाहींस ?–"

" येणार होतों–पण कामांत होतों जरा–"

" कसल्या कामात ?–काय करतोस तूं सध्यां ?–"

" रेशनिंग ऑफिसांत नोकरी धरली आहे–"

" नोकरी ?–"

" बाबा वारले तुला समजलं असेलच. एकदम जबाबदारी अंगावर पडली. सुशी, कुमी नि तारी–तिघींची लग्नं, बाळूचं शिक्षण, खेरीज आई आहेच ! शिक्षणाला रामराम ठोकून आता पैश्याच्यामागें–"

विसू मोठे नि खोटें हंसला. अरुणेला रडूं कोसळायची पाळी आली. दुसरी बस त्यांच्यासमोर थांबली नि घंटा वाजवून पुढे निघून गेली. अरुणेला खिन्न नि शून्य वाटूं लागले. ती म्हणाली, " राहतोस कुठें ?–"

" मी एकटाच आलो आहे सध्या. जागा कुठे मिळते आहे ? एका मित्राकडे रात्रीं झोंपायला असतों; अन् दिवसभर कुठेंतरी–"

" आमच्याकडे ये ना राहायला–" अरुणा आवेगानें म्हणाली.

विसू हसून म्हणाला, " तुमच्याकडे ?–अग, गांवांतली लहानपणची मैत्री ! कोण कुणासाठीं झीज सोसतो ?— तें जाऊं दे रडगाणं ! तूं सांग तुझी हकीगत. तुझं कॉलेज काय म्हणतंय् ?—"

अरुणेला आपल्या आयुष्याची लाज वाटूं लागली. विसू इतक्या हलाखीनं दिवस काढतो आहे अन् आपण चैन करीत जगतो, फॅशन करतो, कॉलेजांत जातों, प्रेम करतों—

शी—शी—

ती घाईघाईनें म्हणाली, " माझं जाऊं दे रे !—तुझ्याबद्दल सांग आणीक—"

"माझं कसलं रडगाण, मी पूर्वीचा विसू राहिलो नाहीं आतां अरुणे–"

"असं कसं?—तू पूर्वीचाच आहेस, पूर्वीचा होशील पुन्हा!—आज तुझ्यावर संकटं आलीं आहेत, पण—"

"तुझ्यासारखं कुणी असं धीराचं बोललं म्हणजे बरं वाटतं. हुरूप येतो. बरं पण मी जातो—ऑफिसला उशीर झाला तर—" बाजूने येणारी बस पकडायला विसू धावूं लागला. अरुणा ओरडून म्हणाली, "आमच्याकडे ये —माझ्याकडे ये—"

अन् विसू दिसेनासा होईपर्यंत ती बसकडे पाहत उभी होती. बस गेल्यावर ती भानावर आली. तिला एकदम उदास, उजाड वाटूं लागले. खिन्नपणे ती घराकडे परत निघाली. विसूची वाक्ये तिला राहून–राहून आठवत होतीं. "एकदम जबाबदारी अंगावर पडली...एकटाच आहे सध्या...तुझ्यासारखं कुणी धीराचं बोललं की हुरूप वाटतो...तुझ्यासारखं कुणी..."

× × ×

कॉलेजला उन्हाळ्याची सुट्टी लागली तेव्हां ह्या खेपेला अरुणेला वाईट वाटलें नाहीं. कॉलेजची दगल शांत होणार, मैत्रिणींच्या गाठीभेटी थांबल्या जाणार, केशव परगावीं जाणार—ह्या साऱ्या गोष्टींबद्दल अरुणेला फारसा खेद वाटला नाहीं. सुट्टी झाल्याबरोबर ती विसूसाठी जागा शोधत हिंडू लागली.

पुण्यांत जागा मिळणें महाकठीण झाले होते पागडीला पैसे कुठले आणायचे अन् वशिले तरी कुणाचे लावायचे?—वणवण करून नि विचार करून अरुणेचे डोके फिरायची पाळी आली. अन् जागा मिळाली तरी इतर अडचणी कमी होत्या काय? थोडक्या पैशात सारे भागलें पाहिजे. पुन्हा बिऱ्हाड केले नाही तर खानावळीतलें कळकट अन्न खायचें. म्हणजे प्रकृतीची पुरी परवड!—

स्वतःच्या दैवाच्या फेऱ्यात विसू सांपडला होता. अन् त्याच्याभोवतीं अरुणा पिंगा घालत होती. दिवसभरच्या दगदगीने दोघेहि दमत; अन् संध्याकाळीं दूरवर कुठेंतरी एकांतांत बसत.

असल्या एकांतात विसूच्या वृत्ती टवटवीत होतात हें अरुणेनें ओळखलें होतें. आपल्या आधारानें विसूचें आयुष्य फुलून निघतें आहे ह्याचा तिला अभिमान वाटूं लागला. ह्या सरळ, प्रेमळ, अचपळ, जीवाला जीव लावून आपण जगवला पाहिजे असे अरुणेला बजावून वाटत होतें.

अन् केशवची नि तिची कहाणी सागूनसुद्धा विसूनें निःशंकपणें तिच्या प्रेमाचा स्वीकार केला तेव्हा तर तिला सारे जग तुच्छ वाटूं लागलें. विसूशीं लवकर लग्न करायचें अन् त्याच्या धडपडणाऱ्या आयुष्यात त्याला साथ द्यायची, त्याचा दुःखभार हलका करायचा आणि त्याच्या निरागस वृत्ती टवटवीत ठेवायच्या—हें एकच तिला डोळ्यापुढें दिसत होतें. त्यासाठीं वाटेल ते दिव्य करायची तिची तयारी होती.

नानाना तिनें आपला निश्चय सागितला. आईबापाशीं, साऱ्या जगाशी बंड करायची तिची तयारी होती. पण तिची कल्पना होती त्यापेक्षा नाना अधिक समजस होते. ते म्हणाले, " छान ! विसू काही वाईट नाहीं. लहानपणचा दोस्त आहे तुझा—अन् बाह्य गोष्टीना न भुलून तूं त्याच्यासह—"

अरुणेला आनद झाला, आश्चर्यहि वाटलें. नानाची विसूला विशेष सहानुभूति असेल ह्याची तिला कल्पनाहि नव्हती. पण अधिक विचार करायची तिची इच्छा नव्हती. विसूच्या एकाकी जीवनांत त्याचें जोडीदार व्हायचे इतकेच ती ओळखीत होती. नाना विसूला जीवनाचे तत्त्वज्ञान सागत होते. तेथून तिनें विसूला ओढलें. म्हणाली, " सदा गंभीर बोलणीं पुरे झालीं. आपण सिनेमाला जाऊं. पुण्यांत येऊन सहा महिने झाले, पण अजून तूं एकदांहि सिनेमाला गेला नाहीस. चल ना—"

दोघेहि बसमध्यें बसलीं नि सिनेमा थिएटरकडे निघालीं.

बसमध्यें अरुणा विसूला चिमटे घेत होती. साऱ्या जगाकडे नाक उडवीत होती.—

थिएटरपाशीं तोबा गर्दी होती. अरुणेनें पर्समधून पाचाची नोट काढली. ती विसूला म्हणाली, " बॉक्सचीं तिकिट काढ ह—"

पाचाची नोट मुठींत पकडून विसू घाईनें गर्दींत घुसला. लोकाची दाटी फार होत होती म्हणून अरुणा बाजूला कोपऱ्यांत जाऊन उभी राहिली.

लोक गलका करीत होते, गुणगुणत होतें. सारें आनंदाचे, उन्मादाचें वातावरण पसरले होतें. त्या बेहोष जगांत विसू वेड लावणाऱ्या आनंदानें तिकिटे काढीत होता. त्या भरलेल्या आनंदी जगात तो एकरूप होत होता.

अरुणा एकटी अवघडून उभी होती. ती गर्दी, ती जत्रा, ती रगेल दुनिया तिला नको वाटूं लागली. हळूहळू ती रस्त्यावरून दूरवर पाहू लागली. कितीतरी वेळ ती तशीच निश्चल उभी होती.

तेवढ्यात विसू वेगानें आला नि हातांतलीं तिकिटे दाखवीत म्हणाला, " चल, अरुणा—"

अरुणा दचकली. भांबावली. तिला काहीं सुचेना. विसू वेड्यासारखा तिच्याकडे पाहू लागला. अरुणेची जिव्हणी थरथरूं लागली. डोळ्याच्या कडा पाण्याने भरूं लागल्या. मग एकाएकी ती आवेगानें उद्‌गारली, " नको— विसू, नको !—आपण सिनेमा पाहणार, चैन करणार; पण तिकडे केशव एकटा आहे !—तो बिचारा काय करीत असेल ? आयुष्यभर काय करील ? —त्याला जन्मभर एकाकी, दुःखी राहावं लागेल—नको, विसू—"



## जोडीदार : ८

खरकट्याची भाडी हौदापासून थोडीशीं डाव्या बाजूला घेतली कीं, मागल्या मोडक्या दरवाज्यातून रस्त्यापलिकडची इमारत नीट दिसूं शकते.

दुपारीं साडेअकरा वाजता शांतीने खरकट्याचीं भाडीं हौदापासून थोडीशी डाव्या बाजूला घेतली आणि मागल्या मोडक्या दरवाज्यांतून रस्त्यापलिकडची इमारत ती नीट निरखूं लागली. ही वेळ हौदावर भाडीं घासायला मोठी छान असे. सकाळीं दहा–साडेदहापर्यंत मुलाचीं नि पुरुषमाणसाची हौदावर चिमण्यासारखीं स्नानं व्हायचीं, अन् नंतर सावकाश बारा–साडेबाराला बिऱ्हाडातल्या बायका खरकटीं भाडीं घेऊन कावळ्यांसारखी कटकट करीत हौदावर जमा व्हायच्या. या दोहोंच्या मधली ही वेळ मोठी शांत नि सोयीची. मामांचीं, वासूचीं, जनूचीं, सुशीचीं–सारीं खरकटीं भांडीं हौदापासून थोडीशी डाव्या बाजूला घ्यावीं आणि मागल्या मोडक्या दरवाज्यातून रस्त्यापलिकडची इमारत निरखीत बसावं......

हौदावर हजर नसलं तरी शांतीचे सारे विचार सारखे त्या इमारतीकडे धावत असत. तिथें केव्हा केव्हा काय काय चाललं आहे हे तिला चांगल पाठ झालं होतं–परिचयाचं झालं होतं ! तरीहि ती तीनतीनदां हौदावर येऊन त्या इमारतीकडे पहात राही. सकाळच्या प्रहरीं प्राजक्ताची फुलें वेंचांत ती इमारतीवर कोरलेलें इंग्रजी नाव चुकतमाकत वाची. कुठल्या तरी साहेबाचं अवघड स्पेलिंग असलेलं नाव होतं, अन् त्यापुढे ' कॉलेज '

असं लिहिलं होतं. प्रातःकाळच्या टवटवीत वातावरणात कॉलेजची ती भव्य अन् दिमाखदार इमारत पाहिली की शातीचे मन मग मोहरून जात असे. आठ वाजतां नळावर पाणी भरायला यावं तेव्हा इमारत झाडून साफ होई, वर्ग उघडलेले असत अन् सार स्वागताला सज्ज असे. दहा वाजता भाडीं विसळून न्यावींत तेव्हा समोरच्या रस्त्यावरून विद्यार्थ्यांचे तुरळक थवे दृष्टीस पडूं लागत. व्हराड्यांत एखादा प्रोफेसर घाईने जातांना नजरेस पडे. पुस्तकाचे गठ्ठे कुठून कुठे जात. नोटीसबोर्डापाशीं मुलांची गर्दी दिसे. अन् सायकलच्या घटाचे, मुलाच्या आरोळ्याचे, हंसण्याचे, शिट्ट्याचे आवाज सुरू होत. घाईघाईने जेवण आटोपून नि मामा कचेरीला अन् मुल शाळेला गेलीं कीं खरकटीं भाडी उचलून हौदावर धावावं, तेव्हा साडेअकराचा सुमार झालेला असायचा. पहाटे प्राजक्ताचं झाड शेंड्यापासून बुंध्यापर्यंत–अन् भोवतालीं जमिनीभरदेखील फुलानीं डवरून जावं, तस आत्ता कॉलेजचे सारे मजले, जिने, व्हराडे–अन् भोवतालची बागदेखील विद्यार्थ्यांनी गजबजून गेलेली असे. हातातलीं खरकटीं भांडीं हौदापासून थोडीशी डाव्या बाजूला घ्यावी, अन् मागल्या मोडक्या दरवाज्यातून रस्त्यापलिकडची इमारत आसासून पहात बसावं.—

हौदापासून जरा डाव्या बाजूला भाडी नेताना शातीची नजर कॉलेजातल्या असंख्य चेहऱ्याभोवतीं घोटाळत हिडूं लागे. भाड्यावरचे मामाचे दि. ग. ढेकणे हें कसल्यातरी शिवीसारखे वाटणारे नाव राखेनें साफ करताना मनोहर घाटे हे कुठल्यातरी उखाण्यात फुल्याची जागा घेतील असे शब्द तिच्या ओठावर नाचूं लागत. दि. ग. ढेकण्यांचीं ढीगभर भाडीं तशींच रहात अन् व्हराड्यातल्या दाटीत मनोहर घाटेची मूर्ति तिला दिसूं लागे.

मनोहर घाटेला तिनें प्रथम पाहिला त्या क्षणापासूनच तिचा खरकट्या भाड्यातला जीव उडून गेला होता. व्ह. फा. च्या परीक्षेंत दुसऱ्यांदा नापास झाल्यापासून ती मामाकडे घरकाम करीत वेळ काढीत होती. मामाकडे तिला जाच नव्हता–त्रास नव्हता !—शिकण्याची तिला मोठी हौस होती असंही नाहीं. अगर भाडी घासण्याऐवजीं घासलेलीं भांडीं फक्त

उचलून ठेवावी, किंवा भाडी विसळण्यापेक्षा स्वेटर विणावा असाही तिच्या मनात झगडा चाललेला नव्हता. मामा–मामी सागतील तस भावडात सामावून वागायचं एवढाच राजमार्ग तिला अवगत होता. पण हौदाच्या डाव्या बाजूच्या मागल्या दारातून कॉलेजपुढचा रस्ता तिला दिसला, अन् तिच्या विचारांना अनेक वाटा फुटू लागल्या. त्या मागल्या मोडक्या दरवाज्यात एक दिवस एक तरुण उभा राहून म्हणाला, ' माझं नाव घाटे, मनोहर घाटे. मी समोरच्या कॉलेजांत शिकतो. मला एखादी खोली हवी आहे भाड्यान––'

जवळजवळ वर्ष होऊन गेल होतं, तरी शातीला तो प्रसंग अगदीं स्पष्ट आठवत असे. ओचे आवरून उन्हात गाद्या टाकायला ती बाहेर आली तेव्हा मनोहर घाटे आला होता. शाती लाजून आत पळाली, पण मग धीटपणे खिडकींतून पाहत राहिली. चाळींतल्या मामासकट साऱ्या पुरुषानीं नि मामीसह साऱ्या बायकानी मनोहर घाटेला वाटेला लावलें. कॉलेजात शिकणाऱ्या अविवाहित मुलाला कुटुंब राहत असलेल्या चाळीत कुठली जागा ?——शातीच्या हृदयात बिऱ्हाड ठेवून मनोहर घाटे तसाच परतला. चाळीतल्या रिकाम्या खोल्या कुटुंबवत्सल लोकानी भरल्या, हौदावरची गर्दीहि वाढली, अन् शाती खरकट्याची भाडीं हौदापासून थोडीशीं डाव्या बाजूला घेऊन मागल्या मोडक्या दरवाज्यातून रस्त्यापलीकडची कॉलेजची इमारत पाहत बसूं लागली.——

जवळजवळ वर्षभर शातीचा हा क्रम चालू होता. मनोहर घाटे दुसऱ्या चाळीत राहूं लागला का फुटपाथवर हिंडू लागला ते शातीला कधींच कळलं नाही. ह्या चाळीकडे त्याने पुन्हा पाहिलेंहि नाही, अगर त्या रस्त्याला तो कधीं आलाही नाहीं. शातीला त्याचे दर्शन होई तें रोज साडेअकराचे सुमारास. खरकट्याची भाडीं घेऊन शाती हौदापाशीं येई तेव्हां तो कॉलेजच्या व्हरांड्यात एका ठराविक कोपऱ्यांत उभा असे. परीटघडीचा पायजमा, लोकरीचा सुंदर कोट, वरच्या खिशात सरकवलेला रंगीत रुमाल.–ठरलेला सुंदर वेष करून ठरलेल्या मोक्याच्या जागीं तो उभा असे. अन् त्याला पाहात शांती भान विसरत असे. दोन्ही हात

भांड्याच्या ढिगावर टेकलेल्या आणि दोन्ही डोळे मनोहरच्या मूर्तीकडे लावलेले. तिच्या हृदयात धडधडाट सुरू होई अन् घटेचे टोले होतान्त तो वर्गात गेला कीं तिचें डोकें ठणकूं लागे. मनोहर घाटे नाहींसा होई अन् दि. ग. ढेकण्याचा संसार ती साफ करूं लागे.

मामाच्या संसाराची उपस करताना शांती स्वतःच्या आयुष्यासंबधीं विचार करूं लागली. हा विचार मामा–मामीनें करावा असें इतके दिवस शांतीला वाटे. 'शाते, शाळा पुरे झाली आता. शाते, खरकटीं भाडीं हौदावर ने; शाते, संध्याकाळ झाली—दिव्यात तेल भर; शाते, लवकर आटप, तुला पाहायला येणार आहेत.'—छे छे, आपल्या आयुष्याची वाट मामा–मामींनीं आखून द्यावी ह्याची शातीला आता खंत वाटूं लागली. तिच्या मनात गोंधळ होऊं लागला. दिव्यात तेल भरताना सांडू लागलं. कधीं नाहीं तें आता पुस्तकं वाचण्यात मन रमूं लागलं. अन् कुणी पाहायला येणार असं कळल कीं—

मामानी आपल्याला सतरा लोकाना दाखवावं आणि कुठंतरी उजवून टाकायला धडपडावं ह्याचा शातीला तिटकारा वाटू लागला. तिला लग्न करायचं होतं, आता तर तिला लग्नच करायचं होतं!–पण मामानीं वाटेल तो वाटेवरचा मनुष्य घरीं आणावा, मामीनं आपल्याला नटवून त्याच्यापुढे उभी करावी, ह्याचा तिला राग येऊं लागला. अन् स्थळं तरी कसलीं?– एक पोस्टातला कारकून, दुसरा कापड–दुकानांतला हिशेब ठेवणारा, तिसरा तर सायकलवरून दूध घालणारा, अशा सामान्य माणसांशीं संसार करायचा! –ह्याना पती म्हणून देवासारखा मान द्यायचा?—

शातीची पतीबद्दलची मतं आतां तयार होतीं. नवरा आपल्या परिस्थितीहून अधिक वरच्या दर्जाचा, आपल्याहून श्रेष्ठ, सर्वतोपरी श्रेष्ठ!–हे कारकून अन् दूधवाले शातीसारखेच सामान्य वर्गातले!—पण म्हणूनच त्यांनीं आपल्याहून निकृष्ट दर्जाच्या मुलीशीं विवाह करावा. एखादी खेडेगांवची, एखाद्या स्वैंपाकिणीची–किंवा कोण असेल ती!—अन् शांतीने?...

खरकट्याचीं भाडीं हौदापासून थोडीशीं डाव्या बाजूला घेतांना शांतीच्या डोळ्यापुढें स्वतःचा संसार उभा रहात असे. तिच्याहून श्रेष्ठ, आदर्श, असा

तिचा पति !–मनोहर घाटे. मनोहरपंत आणि सौभाग्यवती शांताबाई ! त्याचा छोटासा संसार सजवताना शातीला चाळींतलीं सारीं बिऱ्हाडं तुच्छ वाटत. मनोहरपंत अभ्यास करीत बसले कीं त्याच्यासाठीं सुंदर स्वैंपाक करायचा. त्यांच्या मित्राना चहा करून द्यायचा. त्याचा परीटघडीचा पायजमा, लोकरीचा कोट,–सारी तयारी करायची. आपणहून वरच्या खिशात रंगीत रुमाल सरकवायचा. अन् ते जेवून कॉलेजला किंवा कामावर गेले कीं त्याच्या ताटात जेवायचं अन् मग तीं भाडी घेऊन हौदावर जायचं !—

खरकट्याच्या भाड्यावर हात टेकून मनोहर घाटेकडे नजर लाऊन बसलें कीं शांतीला भावी सहजीवनाची असंख्य स्वर्गीय चित्रें दिसूं लागत !

× × ×

कॉलेज–कॉरिडॉरच्या कोपऱ्यांत जरा डाव्या बाजूला उभं राहिलं कीं समोरचा शात नि अरुंद जिना नीट दिसूं शकतो.

दुपारीं साडेअकराचे सुमारास मनोहर घाटेने रगीत रुमाल कोटाच्या वरच्या खिशात सरकवला अन् केसावरून हात फिरवीत तो कॉलेज–कॉरिडॉरच्या कोपऱ्यांत जरा डाव्या बाजूला उभं राहून समोरच्या शात नि अरुद जिन्याकडे पाहूं लागला. ही कोपऱ्यातली जागा मोठी मोक्याची होती. नोटीसबोर्डापासची विद्यार्थ्यांची गर्दी ओसरलेली. पहिल्या घटेची वेळ झाल्यानें बहुतेकजण ग्रंथालयात, वाचनालयात, अगर वर्गांत जात असायचे. प्रोफेसर्स यायला अजून अवकाश असायचा. ह्या थोड्याशा गलक्यात अन् थोड्याशा शांततेत कॉलेजच्या कॉरिडॉरच्या कोपऱ्यांत एकटं उभं राहून समोरच्या शात नि अरुंद जिन्याकडे पाहत रहावं...ह्या घटकेच्या सुखासाठीं मनोहरचें मन सारा दिवस धापा टाकीत असे.

सकाळीं तो जागा होई तो असल्याच सुमधुर स्वप्नांच्या गुंगींत. सकाळचा सारा वेळ, तोंड धुताना, चहा पितांना, दाढी करतांना, खानावळींतली आमटी पिताना, इस्त्रीचे कपडे घालताना त्याच्या नेत्रापुढें हेंच दृश्य दिसत असे. कॉलेजची वेळ झाली कीं त्याची छाती धडधडूं लागे. मित्राना थापा देऊन किंवा खोटें हास्य करून तो घाईनें कॉरिडॉरच्या कोपऱ्यांत येई. डाव्या बाजूला जरा सरकून तो हातांतलीं पुस्तकं सांवरत

समोरच्या शांत नि अरुंद जिन्याकडे आसासून पाहू लागे. हळूहळू जिन्याच्या वरच्या टोकाला हलके नि धावरे आवाज ऐकूं येत. सॅडल्स घातलेल्या, चपला घातलेल्या, मेंदी माखलेल्या, नाजूक, लालसर पावलाच्या जोड्या पायऱ्यावर उमटूं लागत. ' अय्या, इश्श्य, ए ढकलूं नकोस अशी, विसरले बाई नोटस्‌ची वही, ' इत्यादि मोती ओघळूं लागत. अन् त्या विद्यार्थिनींच्या मेळाव्यात रत्नमाला सरदेशपांडेची मूर्ति दिसूं लागे.

रत्नमाला सरदेशपांडे पाहिल्यादा पाहिल्यापासून मनोहर घाटेचे कॉलेज–जीवन असे बनलें होतें. मॅट्रिकमध्यें तो एक हुषार विद्यार्थी म्हणून गणला गेला होता अन् तो परीक्षाही उत्तम प्रकारें पास झाला होता. अनेक आकांक्षा उराशीं धरून तो कॉलेजात आला होता. खूप खेळायचं नि शहरी वातावरणानें सुकून जायचं नाही; खूप अभ्यास करायचा नि प्रत्येक परीक्षेला पहिला नंबर पटकावयाचा; स्वतःच्या गुणावर नोकरी मिळवायची; आईवडिलाच्या पसंतीची पत्नी पत्करायची. चारचौघा सालस माणसासारखी सरळ साधी वाट ही !–पण एक दिवस समोरच्या अरुंद जिन्यावरून रत्नमालेला येतांना त्यानं पाहिली अन् तिला रोज पाहण्यासाठीं मनोहर कॉलेज–कॉरिडॉरच्या कोपऱ्यात रंगीत रुमाल वरच्या खिशात खोचीत, उभा राहूं लागला......

जवळजवळ एक वर्ष झालं अन् मनोहरची सारीं स्वप्नें रत्नमालेभोवतीं विणलीं जाऊं लागलीं. रोजच्या कार्यक्रमांत त्याला अर्थ वाटेनासा झाला. जुने स्नेही तो टाळूं लागला आणि नव्या ओळखी होणं अशक्य होऊं लागलं. सारा वेळ वाचन, विचार, वाट पाहणं !–लेडीज रूममधून पहिल्या घंटेसरशीं रत्नमाला बाहेर पडेल, सख्यांच्या घोळक्यांत अरुंद जिन्यावरून पावलं टाकीत खालीं येईल, अन् वर्गात शिरून पहिल्या ओळीत अखेरच्या डेस्कावर विराजमान होईल. रोज तेच, अन् रोज तींच मेंदी लावलेलीं पावलें, निळ्या किनारीची साडी, ब्लाऊजमध्यें खोचलेलें पार्कर पेन, पुढें घेतलेला शेपटा अन् चौफेर पसरणारा मोहकपणा...कॉरिडॉरच्या कोपऱ्यात जरा डाव्या बाजूला उभं राह्यचं अन् आपल्या प्रेयसीचं दर्शन घ्यायचं !...

होय प्रेयसीचं. भावी पत्नीचं. सौ. रत्नमाला घाटे हिचं डायरींत, वहींत, कवितेच्या ओळी खरडतांना, मनोहर सारख तिचं नाव घेऊं लागला. उद्या लग्नपत्रिका छापताना...

मनोहरला छापलेली लाल लग्नपत्रिका डोळ्यापुढे दिसूं लागे. अन् त्याखालील आई–वडिलाची सही दिसली कीं तो भानावर येई. आई–वडील आपल्या एकुलत्या एक मुलाचं लग्न करायला उत्सुक होते. आईला तर केव्हा एकदा सून येईल अस झालं होत. मनोहर मॅट्रिक झाल्यापासून तिनें त्याच्या लग्नाचा बेत जाहीर केला होता. देवळात, शेजारीं–पाजारीं, बसायला येणाऱ्या बायकाजवळ, ती सून शोधत असे. वडिलाचंही मत मुलाचीं लग्नं वेळच्या वेळच्या वेळीं व्हावींत अस होतं...

कॉरिडॉरच्या कोपऱ्यात उभं राहून आपल्या प्रियेचें दर्शन घेताना हे सारे विचार मनोहरच्या डोक्यात येऊन जात. रावबहादद्दूर सरदेशपाड्याची सर्वात धाकटी, मोटारींतून कॉलेजात येणारी नाजूक मुलगी रत्नमाला आई–वडिलाना आवडेल कीं नाहीं? आपल्यासारखाच साधा व्याही पाहणारे वडील अन् घरकामात कुशल असलेली सून शोधणारी आई! पत्रिकेंत सारीं घरं जमवणारी, चार बुकं शिकलेली, नाकींडोळीं नीटस, दहा माणसाचा स्वैपाक करूं शकणारी, छापील उखाण्यांत मनोहरचं नांव घेऊन लाजणारी,–कुणीतरी बालबोध बालिका!

छे छे, मनोहरचीं स्वप्नं, त्याचा संसार, त्याचा स्वर्ग अगदीं वेगळा होता. फार उच्च तऱ्हेचा होता.कुठल्यातरी अडाणी, अजागळ, चाळींतल्या गोळ्याला दावणीला बाधून त्याच्यासह फरपटत संसार करणं अगदीं रानटीपणाचं होतं. प्रेमविवाहाशिवाय सुखी संसार अशक्य आहे अन् आपली पत्नी आपल्यापेक्षा कमी प्रतीची निवडणं हे तर अगदींच अडाणीपणाचं आहे. आपली अर्धांगी आपल्यापेक्षां सुंदर हवी.–हेवा वाटला पाहिजे साऱ्यांना!—आपल्यापेक्षां सालस नि समंजस, आपल्या आचार–विचार–उच्चारांना सर्वतोपरी साथ देणारी.—

कॉलेज–कॉरिडॉरच्या कोपऱ्यांत रंगीत रुमाल कोटाच्या वरच्या खिशांत सरकावतांना मनोहरच्या नेत्रापुढें स्वतःचा संसार उभा राहात असे.

मनोहर आणि रत्नमाला. मिस्टर आणि मिसेस्!–दोघांनीं एकमेकांकरता बांधलेलें चिमणें घरटे. त्याने तिला घरकामात मदत करायची अन् तिने त्याच्या ऑफिसच्या कामात साहाय्य करायचं. जगापासून अलिप्त अस दोघांचंच विश्व उभं करायचं, संसारांतली सारी सुखदुःख चार हातांनी लुटायचीं, चार नेत्रानीं पहायचीं......

कॉरिडॉरच्या कोपऱ्यात खिशातला रंगीत रुमाल सावरीत रत्नमाला सरदेशपांडेला न्यहाळीत उभे राहिलें कीं मनोहर घाटेला भावी सहजीवनाची असंख्य स्वर्गीय चित्रें दिसू लागत!

घंटा होतांच वर्गात जाऊन पहिल्या ओळींतल्या अखेरच्या डेस्कवर जागा पटकावली कीं आयुष्याचं सार्थक झाल्यासारखं वाटे.

लेडीज रूममधून घाईने बाहेर पडून कुमारी रत्नमाला सरदेशपांडे अरुंद जिन्यावरून खाली आली अन् वर्गात जाऊन पहिल्या ओळींतल्या अखेरच्या डेस्कवर तिने जागा पटकावली. तिला आयुष्याचं सार्थक झाल्यासारखं वाटलं. ह्या जागेचं रहस्य इतर मुलींच्या लक्षात आलय् कीं नाहीं कुणास ठाऊक?–रत्नमालेला मात्र ही जागा मिळाल्याखेरीज पहिल्या तासाला बसणं अशक्य होतं. सकाळीं उठल्यापासून तिला ह्या जागेचे वेध लागत. तेवढ्यासाठीं तिचं जेवण दोन मिनिटात आटपे अन् सौंदर्यप्रसाधनसुद्धा दोन तासांतच पुरें होई. तीनतीनदा ती शोफर आला कीं नाहीं, गाडींत पेट्रोल आहे कीं नाहीं, हातातलं, दिवाणखान्यांतलं, मोटारींतलं घड्याळ बरोबर आहे कीं नाहीं तें पाही. मोटार असूनही कॉलेजांत लवकर येई अन् घंटेचे टोले ऐकतांच अरुंद जिन्यावरून घाईनें वर्गाकडे जाई. पहिल्या ओळींतील अखेरच्या डेस्कवरची जागा पटकावी, अन् मन तिला आयुष्याचं सार्थक झाल्यागत वाटे.

पहिलं चुंबन, पहिलं प्रेम, पहिला स्पर्श इत्यादींप्रमाणें पहिला तास हा एक नवा शोध रत्नमालेनें लावला होता. ह्या पहिल्या तासासाठीं तिला दिवसातले उरलेले तेवीस तास अपुरे पडत. उरलेले क्षणसुद्धां त्याच आठवणीनें भरून निघत. पातळाचा पदर पाठीवर घट्ट ओढून धरायचा, डेस्कावर जरासं रेलायचं, डाव्या हाताचं कोंपर डेस्कावर टेकून डावा तळवा

डाव्या गालावर टेकायचा, उजव्या हातांत उघडं फौंटनपेन घेऊन वही पुढं ओढायची, अन् तिरपी मान करून प्रोफेसर देसायाचं लेक्चर ऐकायचं !

प्रोफेसर देसायाचें पहिलें लेक्चर ऐकल्यापासून रत्नमाला सरदेशपाडेचें आयुष्य असें उजळून निघालें होतें. पहिल्या तासाला तिने वहीचें पहिलें पान उघडलें अन् देसायानीं सुंदर शिकवूनसुद्धा पहिले पान कोरे राहिले. परंतु देसायानी न शिकवलेल्या अनेक गोष्टी रत्नमालेनें हृदयात टिपून ठेवल्या. टेबलासमोर डौलाने उभें राहून अस्खलितपणे देसाई बोलूं लागले कीं रत्नमाला मंत्रमुग्ध होई. तासभर डावा हात तसाच गालावर राही. उजव्या हातांत फौंटनपेन उघडलेलेच असे. वहीचे पहिले पान तसेच फडफडत राही. अन् प्रोफेसरानीं प्रवेश करताच त्याच्याकडे टाकलेला पहिला दृष्टिक्षेप तसाच अचल राही !

देसायांचें तें दर्शन, सुटाबुटातली ती डौलदार मूर्ति, नेत्रातलं तेज, बोलण्यांतला रसाळपणा,—रत्नमालेला त्यापुढं सारं क्षीण नि क्षुद्र वाटू लागलं. इतर प्रोफेसराचे तास, सुट्टीचे दीर्घ दिवस, ग्रंथालयातली भरलेलीं कपाटे, विद्यार्थ्यांची वर्दळ अन् मैत्रिणीच्या कुजबुजी—काहीं काही नको. फक्त एक. पहिल्या तासाला पहिल्या ओळीत अखेरच्या डेस्कवर जागा पटकावयाची अन्......

जवळजवळ वर्षभर रत्नमालेचा हा क्रम चालू होता. कधीं पहिलं डेस्क चुकलं नाहीं; कधीं पहिला तास हुकला नाहीं. कॉलेजात असंख्य घडामोडी घडत होत्या. निवडणुका झाल्या; संमेलनें झालीं, मुलामुलींचा क्रिकेटचा सामना झाला; पण रत्नमालेला कशांत स्वारस्य उत्पन्न झालें नव्हतें. तिला स्वतःला 'कॉलेज क्वीन' म्हणून सारे म्हणत होते तोहि तिला गौरव वाटला नाहीं. असल्या फालतू गोष्टींकडे अन् फालतू पोरांकडे पहायला तिला सवडहि नव्हती. मुलं तिला 'कॉलेजची राणी' म्हणत. ती वर्गात आली कीं स्टँपिंग करीत. तिनें नवी वेषभूषा केली कीं कागदांचे बाण फेंकत. तिच्या डेस्कवर नाहीं—नाहीं तें लिहून ठेवीत. पण रत्नमालेला तिकडे लक्ष द्यायला सवड नव्हती. हे आपले वर्गबंधू अशा जिभल्या चाटीत वर्षभर उनाडक्या करणार अन् बापाचा पैसा संपला कीं चाळींत संसार

थाटून नौकरीसाठीं वणवण करणार...वर्गात बसलेल्या शेंदीडशें मुलांकडे अक्षरशः पाठ फिरवून रत्नमाला प्रोफेसर देसायांकडे डोळ्यांत पचप्राण आणून पाहत बसे. जणूं काय तो वर्ग नाहीच. तिथे टवाळ पोरटी अन् किलकिल करणाऱ्या मुली नाहींत. तिच्यात व देसायाच्यात गुरुशिष्याचे नातें नाहींच...

होय. प्रोफेसर देसायांसारख्या बुद्धिमान् आदर्श पुरुषाला वरण्यांत काय कमीपणा आहे ?–ते किती श्रेष्ठ–आदर्श ! आपले पति शोभतील असे !–त्याच्यासारख्या पुरुषोत्तमाची अर्धांगी होण्यातच खरं जीवन आहे. घटा होताच 'लेडीज् रूम'मधून बाहेर पडून अरुद जिन्यानें घाईने उतरत रत्नमाला जणूं आपल्या पतीला भेटायला आतुरतेनें धांवत असे. घरीं थट्टा करताना आई–वडील म्हणत कीं, वर्गातला एखादा पोरगा पटकावेल तुला, त्याचं तिला हांसूं येई. हे नुसतेच मिरवणारे, लांब कानाचे वर्गबंधू रत्नमालेसारख्या सुंदर, सद्गुणी, श्रीमंत तरुणीचे प्रियकर ?—तिला तिच्य हून सर्वतोपरी श्रेष्ठ असाच पति हवा—! देसायांसारखा !—पाहता पाहता रत्नमालेला आपला स्वर्गीय संसार सर्वत्र दिसूं लागे. टुमदार बगल्यांत विहार करणारे प्रोफेसर अन् प्रोफेसरीणबाई ! दिमतीला गडी, बगीचा, मोटार. साहेबाचीं खूपखूप पुस्तकें अन् बाईसाहेबांचे खूपखूप दागिने. जिकडेतिकडे आनंद अन् उन्माद...

पहिल्या ओळींतल्या डेस्कघर पहिलं पान उघडून प्रोफेसर देसायांच्या पहिल्या तासाला बसलें कीं रत्नमाला सरदेशपांडेला भावी सहजीवनाचीं असख्य स्वर्गीय चित्रें दिसूं लागत !



# माय मरो ! : ९

शोभना शृंगारपुरे शनिवारचा शेवटचा पीरिअड् संपवून वसतिगृहात परतली ती अत्यंत धांदलींतच ! खरं म्हणजे ही हुरहूर, ही धादल शुक्रवारीं संध्याकाळपासून सुरू झाली होती. आला एकदाचा शनिवार–असं करणारा शुक्रवार आला आणि तो सारा दिवस सुट्टीचीं स्वप्नं पाहण्यातच गेला. शनिवारीं ती जागी झाली तेव्हां तिच्या गालाला खळ्या पडल्या. स्नानगृहांत तिला अचानक भोंडल्याचं गाणं आठवलं अन् कॉले-जात तिन्ही तासांना ती वहीच्या शेवटच्या पानावर माजराचीं नि हत्तीची चित्रं रेखाटत बसली. शेवटची घंटा होऊन ती कॉलेजमधून निघाली ती एकाद्या फ्रॉक घातलेल्या मुलीसारखी बागडतच होस्टेलमध्यें आली. शनिवार दुपारपासून सोमवार सकाळपर्यंत सुट्टी होती. मोकळा वेळ होता, बागडायला, बालिशपणा करायला. सारा बगिचा फुलणार होता !

साऱ्या वसतिगृहातच शनिवार–रविवारच्या सुट्टीचा सुगंध दरवळू लागला होता. स्वैपाकघरातल्या आक्कांची रविवारच्या फीस्टची यादी तयार होत होती. रखमानं रविवारीं कोणकोण जणीं न्हाणार त्याची चवकशी चालवली होती. तळमजल्यावरच्या चारी ख्रिश्चन मुलींचा चर्चनंतरचा कार्यक्रम ठरत होता. अन् कोपऱ्यांतल्या खोलींतल्या पारशी मुलीचा कोणत्या मित्राला होकार द्यावा ह्याचा निश्चय होत नव्हता. फायनलच्या मुली अभ्यासाचा तडाखा लावायच्या गप्पा ठोकत होत्या अन् फर्स्ट इयरच्या पोरी चित्रपटांच्या जाहिराती लक्षपूर्वक वाचीत होत्या. कुसुम केतकर नवऱ्याकडे जाणार होती अन् मधुमालती वर्दे घरीं जायची थाप

मारून कुठंतरी जाणार होती. कृष्णा जाधव झोपा तापणार होती. शकू गोखले कविता लिहिणार होती...

शोभना शृंगारपुरेन खोलींत येऊन घाईनं पिशवींत कांहीं कपडे कोंबले. घांदरटपण खोली बंद केली. अन् जाता जाता शेजारणीला ओरडून म्हणाली, " ए—मी जातें ग बेबीकडे—"

बेबी म्हणजे कोण हे शेजारणीला समजलं नाही. शोभना दर शनिवारीं गावातल्या बहिणींकडे पळते हे तिला ठाऊक होत. लग्न झालेल्या वडिल बहिणीला बेबी म्हणतात ह्याचं शेजारणीला हंसू आलं.

शोभना बहिणीकडे पोचली तेव्हा बहिणीचे यजमान दारात उभे होते. शोभनेला पाहून ते हंसून म्हणाले, " ये—वाटच पहात होतों तुझी!"— वसंतरावांच्या त्या स्वागतानं शोभना खूपच खूष झाली. त्याच्या बोलण्याचा आशय तिला अर्धवट उमगला. त्याच्या अंगावरून ती आतुरतेन आंत गेली. गंगावनावरून कंगवा फिरवणाऱ्या आक्काला म्हणाली, " आक्का, मी आल्यें आहे ग!—"

शोभनेच्या शब्दात, पलंगावर पिशवी फेकण्याच्या तिच्या आविर्भावात, अन् ती उड्या मारीत आंत घरात धावली त्या वागण्यात असा अर्थ होता कीं, आक्कानं घाईनं गगावन गुंडाळलं अन् ती घराबाहेर पडण्याची तयारी करूं लागली. वसंतरावांना फक्त कोटच चढवायचा होता. पत्नीची लगबग पाहून त्यानीं कोट नुसता खांद्यावरच लटकावला. शोभना आली, आता घराबाहेर रमलं तरी हरकत नाहीं, ह्याचा हर्ष दोघाच्या मुखांवर पसरला होता.

शोभनेला ह्याचा खेद वाटला नाहीं. सुट्टीला आपण बहिणीकडे येतों— अन् ती संधी साधून आपल्या अंगावर घर टाकून आपली बहीण नवऱ्या-बरोबर भटकते ह्याचा तिला विषाद वाटत नसे. उलट सभेला, सिनेमाला, भटकायला जायला ती त्या जोडप्याला आग्रह करीत असे. नुसतं बाहेरच काय पण बाहेरगावींदेखील दोघांनीं जावं, असं ती म्हणे; अन् एकटी घर साभाळत राही. तिला तें आवडत होतं, हवं होतं. बहिणीला नि मेव्हण्याला यांत प्रथम संकोचल्यासारखें वाटे अन् त्यामुळं शोभनेला अवघडल्यासारखं होई. पुढंपुढं नवराबायकोला संवय झाली, चटक लागली. शनिवार रविवारीं

शोभना होस्टेलमधून घरी राहायला आली कीं, हें जोडपं घराबाहेर पडे—नि होटेलमधे राहिल्यासारख वागे. सभा, सिनेमा, पार्ट्या, ट्रिप्स...

आक्का नि वसंतराव ट्रिपला जाणार ह्याचा शोभनेला आनंद वाटत होता. घाईन दोघंहि बाहेर पडली—अन् घाईनं शोभनेनं त्याना निरोप दिला. आपल्यामुळं आक्काला आयुष्याचा आनंद उपभोगायला मिळतो ह्याचा उच्च आनद तिला वाटला. पण मग ती एकाएकी अधिकच बहरली व मोलकरणीला बोलावून म्हणाली, " जा ग, बेबीला घेऊन ये ! शनिवार आहे तरी केवढा वेळची शाळेंत रमली आहे ! "

बेबी येणार ! दीड दिवस तिच्या सहवासांत मजा करायला मिळणार ! एकांतात, एकटीला ! तिची आई, तिचे वडोल, कोणीहि वाटेकरी नाहींत आतां ह्या आनंदात ! शोभनेला वेड्यागत झालं. तिनं बेबीसाठीं कोको नि बिस्किटं काढलीं. तिची बाहुली शोधून ठेवली. तिचे कसे कसे लाड करायचे ह्याची आरशापुढं उजळणी झाली. अन् तरींहि बेबी आली नाहीं म्हणून तिच्या ओठाना कोरड पडली नि डोळे ओले झाले. मावशी येणार हें माहीत असून ती शिष्टासारखी शाळेंत रमली आहे ह्याचा शोभनेला राग आला. दोनतीन वर्षांच्या चिमुरड्या पोरीला कसली आलीय् शाळा ! माहीत आहे ती मॉटेसोरी ! बेबीवर ती खूप रुसली, फुरंगटून गेली.

तेवढ्यांत छोटीं पावलं वाजलीं. लाडातली हांक ऐकूं आली. शोभना धावत दारांत गेली नि तिनं बेबीला उचलून घेतलं. मुके घेऊन तिचे ओठ ओले झाले आणि आनंदानं डोळे चमकूं लागले.

आई नि बाबा गावाला गेले हें कळलं तरी बेबीला काहीं वाटलं नाहीं. तिची मावशी आली होती. माछी आली होती. बाहुलीपेक्षा, आईपेक्षां तिला मावशी मोठी वाटत होती, महत्त्वाची वाटत होती. मावशीच्या कडेवर बसतांच ती सर्व विसरली, तिला सर्वस्व मिळाल्यासारखं झालं.

अन् शोभना ?—ह्याच स्वर्गसुखासाठी सात दिवस तिची सारी धांवपळ सुरू असे. बेबी भेटणार म्हणून ती घाईन येई. बेबीशीं भरपूर खेळायला मिळावं म्हणून तर बहिणीला बाहेर जायचा आग्रह ! तिचं भगिनीप्रेम, कॉलेजची गंमत सोडून बहिणीकडे परतायची तिची आतुरता, बहिणीकडे

एकटं घरीं राहायचा त्याग करण्याची तिची तत्परता—साऱ्याचं कारण ती गोड पोर होती.

अन् मग मावशीचं नि भाचीचं घरांत राज्य सुरू झालं. सुंदर नावाची नि सुंदर रूपाची, स्वप्नाळू कॉलेज जीवनांत राहणारी अन् स्वप्नाळू भावनांवर वाढणारी शोभना बेबीबरोबर खेळताना जग विसरली. बालिशपणाला बहर आला आणि वात्सल्याचा पूर ओसंडून चालला. बेबीबरोबर ती माजर झाली. फुलपाखरू झाली. तिला पाठीवर घेऊन घरभर कोकरू विकलन् अन् लहान स्टुलावर अवघडून बसून टांगाटांगा खेळणही झाल. बेबीनं नि तिनं भातुकली माडली अन् बाहुलीला न्हाऊं घालून, दूध पाजून, तिचं लग्नही लावून टाकलं !—बेबीच्या गोष्टी ऐकतां ऐकता नि तिच्याशीं बोबडं बोलता बोलतां शोभना साधं नि स्पष्ट बोलणं विसरून गेली !—अन् बेबी रुसल्यावर तिची समजूत घालायची, तिला भरवायचं, पावडर लावायची नि रात्रीं कुशींत घेऊन निजायचं...

दीड दिवस कसा संपून गेला समजलं नाहीं. बेबीला जरासुद्धां आईची आठवण आली नाही—अन् शोभना जरासुद्धां आईची भूमिका विसरली नाहीं. रविवारीं रात्रीं तिनं बेबीला मऊ मऊ भात भरवला अन् मांडीवर घेऊन थोपटून झोपवलं. शोभनेचा पदर घट्ट धरून तिच्या मांडीवर ती गोड पोर शातपणें झोपली होती. तें चिमणं रूप पाहतांच शोभनेला वेड लागायची पाळी आली. ह्या पोरटीनं इतकी कशी माया लावून घेतली आहे ! सुट्टीचा दीड दिवस साऱ्याजणी किती मजा करत असतील; अन् आपण ह्या छोकरीच्या छोट्या जगांत कोंडून घेतों ! कृष्णा कुंभकर्णासारखी पसरली असेल, शकूनं नवं काव्य निर्माण केलं असेल, पारशी पोरीनं नव्या मित्राकडून नवीं बक्षिसं पटकावली असतील, इतर मुली...खुद्द आक्का एखाद्या प्रेमी जीवासारखी पतीसह हिंडत असेल. पण आपल्याला ह्या लहान जीवानं कां जीव लावला ?...

तेवढ्यांत आक्काची नि वसंतरावांची चाहूल लागली. संपली ट्रिप, संपलं स्वर्गसुख ! हक्कानं मिळालेली बेबी आतां दुरावणार !—छे छे, शोभनेचं

ऽर विलक्षण भरून आलं. निजलेल्या बेबीला धडधडत्या छातीशीं धरीत ती ावेगानं उद्गारली.

" बेबी—माझी, माझी लाडकी पोर ती——! "

× × ×

कॉलेजला नाताळची सुटी लागली अन् मुलींचं वसतीगृह बहुतेक मोकळं ाालं. बहुतेक जणी घरोघरीं परतल्या. अन् ज्या उरल्या होत्या त्यांनीं ाफरीचा मोठा बेत आखला होता. स्कॉलरशिप मिळवूं पाहणारी वेणू व ामभंग झालेली शकू दोघीच हॉस्टेलमध्यें उरल्या होत्या.

शोभनेनं आपली खोली आवरून ठेवली नि बॅग भरली. ती घरीं जाणार ाव्हती. आक्काकडे तिला राहायला जायचं होतं. पूर्ण दहा दिवस आक्काच्या ारीं राहायचं होतं !——परंतु नेहमींसारखा तिचा आनंद दाही दिशात धांवत ाव्हता. ती आतुर होती, आनंदी होती. पण तिच्या चेहऱ्यावर सौम्यता ासरली होती. पाढरं शुभ्र पातळ नेसून ती गंभीरपणें आक्काच्या घरीं आली.

वसंतराव दारातच उभे होते. शोभनेला पाहून ते म्हणाले, " ये, ती ुझी वाटच पहात आहे. " त्याच्या मागोमाग ती आंत गेली. कुठूनतरी ोबी धांवत आली. तिला उचलून घेत शोभना बजावून म्हणाली, " बबडे, दगा करायचा नाहीं हं ! आईला बाळ झालंय् ना आता—" आतल्या अधेऱ्या खोलींत आक्का बाजेवर बसली होती. तें दृश्य व बाळंतिणीच्या खोलीचं तें वातावरण पाहतांच शोभनेला खूप बरं वाटलं. ती बाजेवर बसली नि मुलाचं पिणं संपतांच त्याला खेळवूं लागली.

आक्काला दिवस गेल्यापासूनच शोभना ह्या घटकेची वाट पाहत होती. आक्काचे डोहाळे त्रासदायक होते—अन् तिला बाहेर भटकणं, मजा करणं अशक्य होतं. ती स्वतःवर अन् जगावर खूप चिडली होती. लग्नानंतर चारपांच वर्षांतच दोन मुलाची कटकट ! छोटासा दोघांचा संसार सजवायचा, खूप खूप गंमत करायची, हें स्वप्न ढासळलं असं आक्काला वाटलं. असं मुलांचं लटांबर लागल्यावर आयुष्यांत अर्थ तरी काय उरला आहे ? बेबी जरा मोठी होऊं लागली होती—अन् शोभनेवर लोभावली होती म्हणून कांहीं तरी सुटका तरी होती. पण नंतर पुन्हां—

पण शोभनेनं आक्काची समजूत घातली. देवाच्या ह्या देण्याबद्दल दैवाला दोष देण्यांत काय अर्थ होता ? बेबीचा रागराग आक्का कधींकधीं करी, तें तिला मुळींच खपत नसे. किती गोड, गोंडस पोर होती ती. किती लबाड, लाघवी ! डोहाळ्याच्या त्रासामुळं आक्काला बेबीकडे लक्षहि देतां येत नसे; अन् शोभनेला कॉलेजांतून रोज येऊन बेबीची चवकशी करावी लागे.

मग आक्काला बाळ झालं, तेव्हां ती रोज प्रसूतिगृहात जाई. आक्काला हवं नको पाही. घरीं वसंतरावाची म्हातारी मावशी घेऊन राहिली होती, तरी शोभना वसंतरावाची चवकशी करी व बेबीजवळ मिळेल तेवढा वेळ काढी. दहा दिवसांनीं बाळंतीण घरीं आली, तेव्हां तर शोभनेला झपूर्झा घातल्यागत वाटलं. आक्काची सारी व्यवस्था तिनंच जातीनं केली. बाळासाठीं दुपटी, कपडे, पाळणा, खेळणीं......

बेबीइतकं बाळानंही तिचं मन व्यापलं !

बाळाचं नांव काय ठेवायचं ह्या विचारानं साऱ्या कादबऱ्यांचे नायक तपासले. तिच्या एका कॉलेजमित्राचा कॅमेरा घेऊन तिनं बाळाचे अनेक फोटो काढले. अन् बाळाचे कान टोंचले तेव्हा तिच्या डोळ्यातून पाणी घळघळ ओघळलं.

अन् मग आक्काची प्रकृति नीट नाहीं ह्या निमित्तान नाताळची सुट्टी शोभनेनं आक्काकडे घालवायचं ठरवलं !–येतांना तिनं खूप खेळ आणला, बालसंगोपनाचं पुस्तक आणलं, अन् शकूकडून एक बोबड्या बोलाची कवितादेखील रचून आणली–

आक्का शोभनेची वाटच पहात होती. मुलगा फार चिरचिरेपणा करीत होता; अन् त्यामुळं आक्का अधिकच त्रासली होती. दिवसभर बाजेवर लांब बाह्यांचं पोलकं घालून बसायचं, पाळण्याची दोरी हालवायची, औषधं खायचीं, पाजायचं—

शोभना आल्यावर आक्कानं मुलाला पाजून तिच्या स्वाधीन केला, अन् तिला सुटल्यासारखं वाटलं. निदान दहा दिवस तरी शोभनेकडे मुलाला

सोपवायला हरकत नव्हती. इतर वेळ नवऱ्याबरोबर गप्पा मारीत बसता येईल, निदान बागेत तरी हिंडता येईल.

आक्काच्या ह्या आकांक्षेची शोभनेला जाणीव होती. अन् ते तिला पसतंहि होतं. मुलाला खेळवता खेळवता तिनं त्याचा कब्जा घेतला त्याची दुपटी, त्याची औषध–बाळाची ती आईच बनली. बाळाला न्हाऊ घालायचं, तीट लावायची, कपडे घालायचे, बदलायचे, निजवायचं, डोलवायच !–अन् हे सारं चालू असताना बेबी बरोबर असायचीच. तिचहि कौतुक करायचं. तिच्याहि बाहुलीला न्हाऊ घालायच नि डोलवायच !–अन् हीं दोन्ही मुलं नि बाहुली साभाळताना कधींहि कटाळा यायचा नाहीं नि शीणहि वाटायचा नाहीं !

मग दहा दिवसात शकूच्या कवितेची कडवी घरभर घोळूं लागली. बाल-संगोपनाच्या पुस्तकातल्या पाठाच प्रात्यक्षिक सुरू झालं. जिकडे तिकडे बाळाची खेळणी विखुरली–नि त्यात शोभनासुद्धा एक खेळण होऊन बसली.

तिला खरच अगदीं वेडयासारखं झालं होत. बेबीला बरोबर घेऊन बाळाच करायचं–ह्यात स्वर्गसुखाचा केवढा ठेवा साठला होता. आपण अविवाहित आहोत, तरुण आहोत, कॉलेजात आहोत, हे ती पुरे विसरली. हातात पाळण्याची दोरी धरून जाग्रण करणारी आई, बाळाला औषधं काढे पाजणारी नर्स, अन् मुलाचे घाणरडे कपडे धुणारी मोलकरीण–अशा भूमिका शोभना करूं लागली.

—फक्त पिण्याच्या वेळेला बाळ आईकडे जाई, अन् तेवढे क्षण शोभनेला सुने वाटत !

इतक मुलाचं वेड का वाटाव ? लहानपणीं ती काही बाहुला–बाहुलींत फारशी रमली नव्हती. मावस बहिणीच्या मावस भावाच्या मुलाबद्दल तिला इतका आपलेपणा कधीं वाटला नव्हता. तिच्या मैत्रिणींचीं मुलं फार गोड होती, पण असं वेड लावलं नव्हतं त्यानीं !–मग बेबीबद्दल नि बाळाबद्दल येवढी माया का ओसंडून जावी ? तिला मुलांची आवड उत्पन्न झाली होती ? शोभनेनं तर लग्नाबद्दल विचार केला नव्हता. मुलं व्हावीत अशी वासनाहि कधीं बाळगली नव्हती. मग—

शोभनेला साराच चमत्कार वाटे. दहा दिवस मनापासून राबतांना कधींमधीं तिला स्वतःचंच आश्चर्य वाटायचं! पण ती जास्त विचार करीत नसे. मुलं होतींच तशीं गोड. बेबी बॉब करून नि फ्रॉक घालून कशी गोडगोड दिसायची अन् बोलायची कशी चुरूचुरू?—अन् बाळ तर फारच लबाड होता. दहा दिवसच काय—दहा जन्म घालवावेत अशीं मुलं मिळवायला!

अन् मग नाताळची सुट्टी भरभर संपत आली. आतां पुन्हा कॉलेजांत जायचं, होस्टेलमध्ये एकट राहायचं, जमेल तस येऊन मुलाना घ्यायच!—शोभनेला कससंच वाटू लागल! जायच्या आदल्या रात्रीं तिनं बाळाला पोटाशीं घेतलं. अन् बेबी मानेला मिठी मारून झोपली होती तिला तशीच ठेवून ती अंथरुणावर आडवी झाली. बाळाची झोप चाळवली कीं शोभना त्याला पोटाशी धरी—अन् शोभना हालली कीं मिठी मारून विसांवलेली बेबी अगाशीं अधिकच बिलगे. या मायेच्या मिठींत सारी रात्र शोभना काढीत होती.

मग पहाटे ती जागी झाली. शेजारच्या खोलींतून आक्काच खोकणं नि वसंतरावांचं कुजबुजणं तिला ऐकूं आलं. हे जीव, परक्याचं हें धन आई-बापाच्या स्वाधीन करून आता एकट्यानं पुन्हां जगांत जायचं!—शोभनेचं आंतडं तुटूं लागलं. दोन्ही मुलाना पोटाशीं धरून ती पुटपुटत राहिली,

"माझीं—माझीं बाळं तीं—"

× × ×

शोभना बी. ए. झाली, आणि तिचं वसतिगृहांतलं आयुष्य संपलं! कॉलेजमधलं मोहक आयुष्य मागं गेलं अन् वसतिगृहांतले गोड क्षण उरले नाहींत. वेणू स्कॉलरशिप मिळवून कॉलेजातच शिकवूं लागली, मधुमालती परीक्षेआधींच पळून गेली, शकूला हिस्टेरिया झाला होता. बऱ्याच जणींचीं लग्नं झालीं. बाकीच्या मास्तरणी बनल्या......

शोभनेला पुढें शिकतांहि येईना, आणि घरीं जाऊन वधूपरीक्षाहि देतां येईनात. कॉलेज कायमच संपलं—आणि ती बहिणीच्या घरीं येऊन राहिली.

कदाचित् कायमचं राहावं लागेल ह्या कल्पनेनं !–कारण आक्काला पुढल्या बाळंतपणात फार त्रास झाला अन् ती एकाएकीं वारली ! !

आक्काच्या मृत्यूनं सर्वांवरच आकाश कोसळलं. मुलं तर बिचारीं पोरकी झालीं, आणि वसंतराव वेड्यासारखं करूं लागले. वसंतरावाची मावशी कायमची येऊन राहिली. अन् आक्काचे आईवडीलहि वारवार येऊन धीर देऊं लागले. मुलाना मावशीचा विलक्षण लळा म्हणून शोभनेला पुढील आयुष्याचा सारा विचार सोडून मुलासाठीं आक्काच्या घरी येऊन राहावं लागल !

शोभनेनं सारी पुस्तकें नि वह्या बाधून ठेवलीं, आणि ओचेपदर बाधून ती मुलाच्या खस्ता खाऊं लागली. बेबीचे केस विचरायचे, कपडे घालायचे, भात भरवायचा, शाळेंत पाठवायचं, हट्ट पुरवायचे !–अन् बाळ तर बिचारा लहानच होता. सारखा रडायचा नि आजारी पडायचा.–त्याला उगी करायचं, अन् सारखं जपायचं !-सारा दिवस, दोन्ही मुलं तिच्या पायात घोटाळायचीं, खांद्यावर चढायचीं, हृदयांत घालमेल उडवून द्यायचीं !

आक्काच्या मृत्यूचं दुःख कालांतरानं कमी झालं. आणि शोभनेच्या अस्तित्वानं घरांत पुन्हां आनंद बागडूं लागला.

शोभनेला हें समजत होतं. आक्काच्या शोकानं ती व्यथित झाली होती; तरी नकळत सुखाची एक फुंकर तिच्या हृदयावर वावरत होती. शनिवार–रविवारची भेट नाहीं, किंवा नाताळची सुट्टी नाहीं–आतां लागेल तितके दिवस, न संपतील इतके दिवस मुलांच्याबरोबर राहायला मिळणार– अन् मुलं सर्वस्वीं आपल्याजवळ राहणार, आपली असणार ही जाणीव सूक्ष्म होती आणि सुखावहहि होती. वसंतरावांचं घरांत विशेष लक्ष नसे. म्हाताऱ्या मावशीबाई देवधर्मांत दंग असत. शोभनेला घरांत पूर्ण अधिकार होता. बेबीच्या बाईना बोलायचं, बाळाच्या डॉक्टरकडे जायचं, मुलांचे कपडे विकत घ्यायचे, त्यांना फिरायला न्यायचं–जणूं तीं तिचींच मुलं होतीं. अन् त्या तिघांशिवाय जगांत दुसरं कुणीच नव्हतं !

एकाद्या स्वप्नासारखी वाटणारी शोभनेची सुखाशा आता साकार झाली. एकाकी ठिकाणीं घरट बांधून ह्या दोन पिलांवर पाखर करीत जन्म काढावा हे तिचं ध्येय प्रत्यक्षात आलं—

अन् ह्या घरट्यात, उबदार पंखाखालीं आपल्या पिलांना घेऊन ती फावल्या वेळात बाह्य जगाकडे पाहू लागली. नुकतंच घालवलेलं कॉलेज-मधलं नावीन्यपूर्ण जीवन, होस्टेलमधले उन्मादक क्षण, अनेक कथा, कादंबऱ्या, फॅशन्स नि गाणी, मुलांनी केलेल्या कोट्या नि कुजबुज! बाळ निजलेल्या पाळण्याची दोरी ओढीत आणि मांडीवर निजलेल्या बेबीला थोपटत शोभनेला हें सारं आठवत असे.

दिवसभरच्या धमालीत अर्थात् कुठल्याच गोष्टीला वेळ नव्हता. बेबीच्या बोबड्या बोलांपुढं नि बाळाच्या सुरेल रडण्यापुढं दुसरं कांहीं करायची सोय नव्हती! पण रात्र पडली अन् बाळाची झोंपेची वेळ झाली नि बेबी पेंगुळली कीं शोभनेला चमत्कारिक वाटे, सारंसार आठवे. आठवावंसं वाटे.

अन् मग अनेक महिने लोटले तेव्हां तिच्या लक्षात आलं कीं आपण रोजचं वर्तमानपत्रहि वाचत नाहीं. कित्येक दिवसांत आपण दोन वेण्या घातल्या नाहीत. अन् चांदण्या रात्रींची शोभा पार विसरून गेलों.

तिच्या अंगातलं रक्त सळाळून उठलं, अन् तिचं मन चौफेर धांव घेऊं लागलं. वसंतरावांच्याकडून ती वर्तमानपत्र घेऊं लागली, अन् रोज दोन वेण्या घालूं लागली.

आणि एक दिवस तिनं रात्रीचं चांदणं फुललेलं पाहिलं! तिनं भटकायला जायचा बेत केला. बेबीला दामटवून निजवली, बाळाच्या पाळण्यापाशीं मावशीबाईंना बसवलं, अन् थाटाची वेषभूषा करून ती बाहेर निघाली.

वसंतराव क्लबमधून परत येत होते. ते चकितच झाले. अन् तिला सोबत म्हणून तेहि तिच्याबरोबर फिरायला गेले.

निर्जन रस्त्यावरून, गजबजलेल्या चित्रपटगृहाजवळून, थंडगार पुलावरून, नि सुगंध सुटलेल्या बागेतून दोघंहि खूप भटकलीं.

शोभना घरीं आली तों मावशी जोरानं पाळण्याची दोरी ओढीत होत्या नि रडणाऱ्या बेबीला दटावत होत्या. बाळाचं दुपटं भिजून चिंब झालं होतं.

बेबी बावरून हुंदके देत होती. तिन फेकलेल्या बाहुलीचा हात फुटून दूर पडला होता. शोभनेन दुरून सार पाहिलं–अन् मावशीबाईचा अवतार पाहून तिला खूप हसू लोटलं. वरकोट काढायला ती कपडयाच्या खोलीत गेली. तिनं खुर्च्याळ्यावर कोट ठेवला. त्याच्याजवळच वसंतरावाचा कोट खाद्यावर ठेवल्यासारखा लटकत होता. तो कोट, त्या कोटाला येणारा विवक्षित वास तिला वेड लावू लागला.

ती आवेगानं वसतरावाच्या खोलीत आली. वसंतराव जणू तिची वाटच पाहात होते. तिचे हात हातात घेत ते अर्धवट प्रेमाच्या स्वरात, अर्धवट क्षमेच्या रूपात तिची विनवणी करू लागले, "शोभना, शोभा–माझ्यावर रागावूं नकोस !–पण माझ्या मागणीचा विचार कर. मी प्रेमान, प्रामाणिकपणान पाणिग्रहणाची इच्छा करतो. तूं खूप सुदर आहेस. प्रेमळ आहेस. माझ्यापेक्षा खूप चागला नवरा तुला मिळेल. पण माझ्याशी लग्न केलस तर–तर मी तुला खूप सुखात ठेवीन !–आपण खूप मजा करूं !–असं चादण्यातून उन्मादानं भटकू !–सिनेमा पाहू, सफरी काढूं !––चडोलासारख जगू !"

शोभनेपुढे स्वर्ग उभा राहूं लागला. चादरात, चंडोल, सफरी, सिनेमा, दोघाचं उन्मादानं भरलेलं केवढ गोड विश्व !–तिला वेड्यासारखं झालं. साऱ्या आनंदाला, उपभोगाला ती आतुर होती. तिला प्रेम करायचं होतं, प्रणय लुटायचा होता, बेहोषपणे वागायचं होतं. तिचं सार शरीर थरथरलं. हात पुढ करायच्या आत, ओठ पुढं करायच्या आत ती आवेगानं अचानक उद्गारली,

"...हो, ह्यासाठी मी आतुर आहें––पण पण–ही मुलं––ही अडगळ..."



## आमंत्रण : १०

मुसळधार पावसांत छत्री मिटवून काठीसारखी टेकीत टेकीत विसूभाऊ जडपणें घरीं परतले. माजघरात वाट पहात बसलेल्या सुशीलाबाईंना नवऱ्याचा तो अवतार पाहून धस्सच झालें. आवेगानें त्या उठल्या व विलक्षण व्याकुळतेनें म्हणाल्या, " हे काय वेड्यासारखं? छत्री मोडली?– जरा थांबायचं कुठेंतरी. अन् भेटले का बुवा? "

विसूभाऊंनीं भिजलेली छत्री वाळण्यासाठीं उघडून कोपऱ्यात टेवून दिली. पत्नीनें पुढें केलेल्या पंचा हातात घेऊन ते तसेच झोपाळ्यावर बसले, नि खिन्नपणें म्हणाले, " मुलं जेवलीं का?–तुम्हीं जेवणं करून घ्या. मला भूक नाहीं—"

सुशीलाबाईनीं पुढें होऊन नवऱ्याच्या हाताला हात लावला. ओल्या झालेल्या अंगांतून तापाचा चटका बसत होता. त्या चांगल्याच चरकल्या नि म्हणाल्या, " तुम्हाला ताप भरलाय! उठा, अंग कोरडं करून पडा स्वस्थ. "

विसूभाऊ उभे राहिले. तेवढ्यात बाजूच्या खोलींतून कुसुम आली. मागोमाग माधव व बाळ. मुलाना पाहताच विसुभाऊ वेडयासारखे तसेच उभे राहिले नि त्यांच्या सताड डोळ्यांतून पाणी ओघळूं लागलं. वडिलांचें तें विलक्षण स्वरूप पाहून मुलें थबकलीं व बावरून पहात राहिलीं. सुशीलाबाईंना सुचेनासे झालं. क्षणमात्र सारेंच कुटुंब तटस्थ झालं! मग एकाएकीं सुशीलाबाई म्हणाल्या, " कुसुम, तुम्ही तिघं जेवून घ्या. आम्हाला जेवायचं नाहीं. जा बाळ! अन् भांडूं नका, जा. "

मुलं गेलीं. विसूभाऊ कपडे बदलून पाघरुणांत पहुडले. सुशीलाबाई उशाशीं बसून राहिल्या. कुणीच बोलत नव्हतं. नवऱ्याला झोंप लागावी अस त्याना वाटत होतं. पण विसूभाऊंना आज झालंय् काय ह्याचं त्यांना कोडं पडल होतं. नवऱ्याने न झोपता सारं सागावं असंहि त्याना वाटत होतं !– मुलं जेवणं उरकून झोपली. विसूभाऊ तळमळत कुशी बदलत होते. अन् सुशीलाबाई जागत बसल्या होत्या.

अखेर सुशीलाबाईना तेथेच झोंप लागली !

रात्रीं केव्हातरी त्या दचकून जाग्या झाल्या. विसूभाऊ उठून बसले होते अन् त्याना हांका मारीत हलवीत होते. म्हणत होते, " जागी हो, डोळे उघड, मला तुला कांहीं सागायचं आहे—"

सुशीलाबाईंना एकदम जाग आली, अन् त्यांचें हृदय फाटून गेलें. उभ्या एक तपाच्या संसारांत विसूभाऊ असे वागलेले त्यानी पाहिले नव्हते. अन् आज ते म्हणत होते, " आज दुपारीं बुवाची भेट झाली—"

" हो ? काय सांगितलं त्यांनीं ? कांहीं वेडंवाकड भविष्य सांगितलं ? "

" वाकडं नि सरळ !—भविष्याला कसलीं वळणं असणार ? "

" काय म्हणाले ते ?—गेल्या चार खेपांना त्याचं म्हणणं खरं ठरलं होतं. नोकरी आठ दिवसांनी मिळेल म्हणाले, नि नेमका आठव्या दिवशीं हुकूम हातीं आला. बाळाची बरोबर जन्मवेळ तर कितीतरी आधीं सांगितली. तसंच—"

" तसंच आजचं—" विसूभाऊ बायकोला अडवून म्हणाले. मग आपलं वाक्य तसंच अंधारांत सोडून ते स्तब्ध झाले.

सुशीलाबाई अगदीं अस्वस्थ झाल्या. त्या घाबरून म्हणाल्या, " आजचं काय ?—कांहीं वाईट आहे ?—असलं तरी भ्यायचं कशाला ?—मी आहें ना ? "

" शाबास ! " विसूभाऊ हंसले. त्यांचं हंसणं पाहून सुशीलाबाईंच्या डोळ्यांत मात्र पाणी तरारलें. विसूभाऊंनीं तें पाहिलें. शांतपणें बायकोचे डोळे टिपीत ते म्हणाले,—

"तूं रडूं नको!—तुला रडून कसं चालेल!—तीन मुलाची जबाबदारी आहे तुझ्या एकटीवर."

"काय बोलण हे—"

"हो!—कार्तिकी अमावास्येनंतर मी जगत नाही. दोनतीन महिन्याचा सोबती आहें सारा. बुवानी चक्क सागितलं—"

सुशीलाबाईनीं बोलण्यासाठी तोंड उघडल: "जळले मेले बुवा! वाटेल ते अभद्र—" पण त्या तशाच मूक राहिल्या. एकाहून एक महत्त्वाच्या बातम्या बिनचूक सागणाऱ्या बुवाची बत्तिशी खोटी कशी ठरेल?—पण आपला तरुण, धडधाकट पती—आपलं सौभाग्य.. सुशीलाबाईच्या अगाला विलक्षण कापरें भरले. नवऱ्याचा भकास चेहेरा पहाताच त्याना भडभडून आले. पतीच्या गळ्यात मान टाकून त्या मुक्त कठाने रडूं लागल्या. अन् इतका वेळ बळेच दाबून टाकलेले अश्रू विसूभाऊंनाहि आता आवरेनात. बुवाचं बोलणं!—कार्तिक अमावास्येच्या सुमारास...संपणार सारं!... मरणार आपण! मरणार!!...विसूभाऊहि ओक्साबोक्शी रडूं लागले...

अपरात्री कोसळणारा मुसळधार पाऊस थाबला. पण ह्या जोडप्याचे जागत राहून अश्रुमोचन करणें कमी होईना...

× × ×

आणि मग साऱ्या संसाराचा आकार बदलला. रग पालटला.

त्या रात्रीच्या रडण्यानंतर विसूभाऊंचे डोळे कायमचे कोरडे पडले. खरं म्हणजे त्यांच्या अंगातलेंच पाणी पळालें. उंचनिंच असलेली यष्टि वाकली. त्याच्या केंसांत पाढऱ्या रेघा दिसू लागल्या. कपाळावर तर काळजीचें जाळेंच जमलें. कुठें तरी पहात, कसें तरी वागूं लागले ते!

प्रथम प्रथम मनाला मुद्दाम समजावायचा यत्न होई. असं होणं शक्य नाहीं. सारीं भविष्यं खरीं ठरतात थोडींच?—अन् मृत्यूचीं भविष्यं वर्तवणं तर सर्वांत अशक्य आहे!—तशांत सुशीलाबाई कुठून कुठून बातम्या आणत. तो बुवा म्हणे लफंगा आहे. पैसे मिळवायची पद्धत आहे ही त्याची, असं कुणी म्हणत. कुणी म्हणत, लोकांना असं छळण्यांत त्याला आनंद वाटतो.—पण हें ऐकूनहि खात्री वाटत नसे. अन् मग त्यांना

अधिकच खिन्न वाटे. स्वतःची समजूत, स्वतःची फसवणूक चालली आहे अस सारख वाटे हेच भाविष्य नेमक चुकणार काय?—छे, हेंहि भविष्य खरं ठरणार!

सुशीलाबाईंचे नवस, अभिषेक, उपास सुरू होते. पण विसूभाऊंना शंका नव्हती, आशा नव्हती. त्याना भाविष्य कळल होत. मृत्यु दिसला होता!

अन् मग साऱ्या ससाभर त्याची दृष्टि रेंगाळत राही. ह्या माडलेल्या खेळातून आपण उठून जाणार! ही ओसरी, हे माजघर, हें स्वैंपाकघर, हें न्हाणीघर, ही बसायची खोली—सारे दूरावणार! ह्या खिडकींतून दिसणारा रस्त्याचा भाग हे आजूबाजूचे शेजारी, घरापासच्या ओळखीच्या खुणा, घरावर अखड उभ असलेलं आकाश—काहीं काही पहायला मिळणार नाहीं पुन्हा! वटवाघुळासारखं विसूभाऊंचं मन घुटमळत राही. आपल्या नावाची पाटी काढली जाणार! आपले जोडे, आपले कपडे, आपलं अंथरुण कुणाला तरी देऊन टाकलं जाणार. आपला फोटो फार तर पूर्वजाच्या प्रदर्शनांत लटकत राहणार; बाकी आपलं अस्तित्व उरणार नाही! हो, पत्नीच पांढरं कपाळ, पोराचे दीनवाणे चेहरे हीच आपली साक्ष...

आपण मेल्यावर काय घडेल ह्या चिंतनात विसूभाऊंचा वेळ जाई. आपण नसलेल्या संसारांत ते आत्तांपासूनच भुतासारखे वावरूं लागले. जेवतांना त्यांना सारखं वाटे, कांहीं दिवसानीं एक पान कमी होणार!—अन् मग घशाखालीं अन्न उतरत नसे. झोपताना वाटे, काहीं दिवसांनीं एक गादी कमी होणार!—अन् मग रात्रभर झोंप येत नसे.

आतां ते पत्नीपासून दूर झोपत! तिच्या स्पर्शांत, सहवासांत सुख वाटत नव्हतें. मन रमत नव्हतें. अन् तिला सवय सोडायला शिकवलं पाहिजे! ह्यापुढें तिला एकट्यानें आयुष्य कंठायचं आहे. शारीरसुखाचा कायमचा त्याग करायचा आहे......

नवऱ्याची ही तऱ्हा पाहून सुशीलाबाई रोज रडत. अन् रोज नव्या धीरानें नवऱ्याची समजूत घालीत. पण विसूभाऊंची पत्नीबद्दलची ओढ आटोपली होती. तिची समजावणी, विनवणी त्यांना मोह पाडीत नव्हती, आशा दाखवीत नव्हती.

अन् मुलांना तर ते एकसारखे टाळीत. कुसुमला अभ्यासांत काहीं अडलं कीं शेजारच्या प्रभाकरपंताकडे पाठवीत. माधवला तीनतीनदा म्हणत, ' फार दंगा करूं नको हं, नीट वाग. ' अन् छोट्या बाळाला पाहिले कीं आवढा गिळून ते अदृश्य होत. ह्या पोराला जीव लावला तर त्याला फार त्रास होईल मागून !......

अन् भाऊंनीं घेतलं नाहीं, भाऊंनीं खाऊ दिला नाहीं, म्हणून बाळ टाहो फोडत राही. त्याची कुणीच समजूत घालीत नसे. माधव दंगा न करता गप्प बसून राही. पण विसूभाऊ त्याच्याकडे हंसून पहात नसत. कुसुमला वडिलाच्या वर्तनाचा चमत्कार वाटे. ती आईला जाऊन बिलगे. अन् बिचारी सुशीला...

विसूभाऊंना संसाराचें सुतक उरलें नव्हतें. हळूहळू त्यांनीं अंग काढून घेतलें. रेशनच्या बारींत कुसुम उभी राहूं लागली. वाण्याच्या दुकानाला माधवला पिटाळण्यात येऊं लागलें. मंडईत स्वतः सुशीलाबाई जाऊं लागल्या. विसूभाऊ कुठेंतरी अडगळींत बसून वेळ काढूं लागले. घरांतली मंडळी एकत्र जमली की ते खिडकींत उभे रहात. अन् रस्त्यावरून कुणी ओळखीचं जाणारं दिसलं कीं पटकन आत लपत.

काय करायचं होतं लोकाना भेटून ?—दोन अडीच महिन्यांनीं ते मरणार होते. एकटेच जाणार होते. कुणी मित्र अगर ओळखीचे लोक बरोबर येणार नव्हते. मग काय करायचं आहे ह्या लोकांशीं ? लहानपणापासून मैत्री असलेल्या जोश्याला भेटून काय फायदा ?—उगाच वायफळ गप्पा मारायच्या, हंसायखिदळायचं. अन् मेल्यानंतर त्यांनीं ह्या साऱ्या गोष्टी आठवायच्या. विसू असं बोलला नि तसं हंसला ! अन् ऑफिसांतल्या नाईककडे कशाला बातम्या काढायला जायचं ?—पुढची ग्रेड, साहेबाची मर्जी, ह्यांतून तर सुटलों. आतां आपल्या जागीं त्या...पण कुणालाहि नेमलं तरी काय पर्वा ?—अन् शेजारच्या प्रभाकरपंतांनीं उसने नेलेले पंधरा रुपये कशाला मागायचे ?— तेवढ्यासाठीं उगाच...प्रेतयात्रेला येण्याचा त्रास त्यांना ध्यावाच लागेल......

आजूबाजूच्या लोकांना, स्नेह्या–सोबत्यांना विसूभाऊंच्या वर्तनाचा चमत्कार वाटे. ब्रिझिकचा डाव माडला कीं विसूभाऊंची पहिली हजेरी असे. पण आतां पत्त्याच्या वाऱ्यालाहि विसूभाऊ उभे रहात नसत. सकाळ–संध्याकाळीं नळावर, रस्त्यावर, भेट होऊन गप्पागप्पा करणारे विसूभाऊ कुठेंच दिसत नसत. घरीं गेलं कीं बाहेर गेले आहेत म्हणून उत्तर मिळे. अन् बाहेर—

विसूभाऊंनीं नोकरीचाहि राजिनामा देऊन टाकला! साहेबानं खूप समजूत घातली. इतक्या वर्षांची नोकरी, संसाराची जबाबदारी, पुढचे प्रॉस्पेक्टस् ..विसूभाऊ कोरडे हंसले, अन् कायमचे घरीं आले.

पत्त्याच्या डावातला एक भिडू उठून गेला, नळावरची एक बादली कमी झाली, कचेरींतलं एक टेबल रिकामं पडलं.–विसूभाऊंनी आपलं रेशनकार्डहि परत केलं!–घशाखालीं घासहि जात नव्हता तर काय करायचं आहे धान्य आणून! सारा वेळ ते घरात बसून रहात. न जेवतां न बोलता, एका कोपऱ्यात, एका कडेला!

सुशीलाबाई सारा वेळ त्याच्या भोंवतीं भोंवतीं करीत. त्यांच्या डोळ्याचं पाणी खळत नव्हतं. त्यांच्या विनवण्या आटपत नव्हत्या. विसूभाऊंच्या कपाळाला अंगारा, दंडाला ताईत वगैरे केव्हाच लावला होता त्यानीं. मुलं तर वडिलांना भिऊं लागलीं होतीं, व आपण होऊनच दूर झालीं होतीं. पण विसूभाऊंचें बिलगलेल्या बायकोकडे अगर दूरावलेल्या पोराकडे लक्षच नव्हते. ते वाट पहात होते, वेळ काढीत होते.

अन् घडयाळ टिकटिकत राही, कॅलेंडरचीं पानं टरकलीं जात. चंद्र-सूर्याचं रहाटगाडगं फिरत राही! भर अंधारांत सांवल्या दिसत. दिवसाच्या कोलाहलांतहि हलकेंच पावलें वाजत.—अगदीं संथ, सावकाश. पण निश्चित, निश्चयी!—मृत्यु येणार होता, योग्य वेळीं येणार होता!

झपाट्यानें अलिप्त होणारे विसूभाऊ आतां शांत दिसूं लागले. त्यांची धांवणारी दृष्टि थंड झाली. त्यांची विस्कळित वागणूक बंद झाली. आजूबाजूच्या कोलाहलांतून ते पूर्ण अलिप्त झाले. कुणाचाच त्रास उरला नाहीं. कसलीच ओढ उरली नाहीं......

मुक्त झालेल्या त्यांच्या मनाला आतां जाग आली. ते उठले. पत्नीचे सारे दागिने त्यांनीं मोडले, अन् रोकड करून बँकेत भरली !–सुशीलाबाई धाय मोकलून रडल्या. मोठ्या सोहाळ्याने मिळालेले स्त्रीधन, मोठ्या कौतुकानें केलेल्या कुडयाबांगडया,—सारी लक्ष्मी घराबाहेर नेताना त्यांची आतडीं तुटलीं. नवऱ्याला कसं समजवाव हेंच त्याना समजेना. उलट विसूभाऊच तिचं सांत्वन करीत होते. आपल्या विधवेला आधार देत होते. सुशीलेनें रडून हातपाय गाळून कसे चालेल ? तिनें धीर धरला पाहिजे. तिला पैशाअडक्याची माहिती व्हायला पाहिजे. बँकेचे व्यवहार व्यवस्थित कळले कीं दरमहा तिला पैसे काढतां येतील. नवरा मेल्यावर लोकांच्या घरीं पोळपाट–लाटणं घेऊन धावावं लागणार नाहीं !

त्याच भरात विसूभाऊनीं विम्याची रक्कम मिळवून द्यायची व्यवस्था केली. घरमालकाला वर्षाचे भाडें आगाऊ देऊन टाकलें. अन् एक दिवस ते सरळ उठले, बाळ माधवला घेऊन त्याच्या आजोळी दाखल झाले. आपल्या मृत्यूनंतर मुलाच्या मामांनीं मुलांच्याकडे पहाव, त्याच पालकत्व पत्कराव......

साऱ्या घरभर, आजोळीं अन् आजूबाजूला एकच आश्चर्य पसरलं, आकात उडाला ! विसूभाऊंच्या वर्तनाचं सर्वांनाच वाईट वाटलं. पण स्वतः विसूभाऊ हर्षखेदापार पोचले होते. वेदांताचा अगर वादविवादाचा, आशेचा अगर अश्रूंचा कसलाच विचार त्यांना वेढीत नव्हता. एकटेच ते स्मशानात जाऊन बसत; आपल्या प्रवासाच्या सुरुवातीच्या स्टेशनकडे पहात बसत !

आतां सर्व तयारी पूर्ण झाली !—पैशाअडक्याची पूर्ण व्यवस्था झाली. मुलाच्या शिक्षणासाठीं, कुसुमच्या हुंडयासाठीं, पत्नीच्या चरितार्थासाठीं, होईल ती सोय विसूभाऊंनीं केली. दागिने, उंची कपडे, फर्निचर, स्वतःचं घडयाळ, आगठी, पेन, सारं फुकून बायकापोरांच्या भवितव्याची तरतूद करून ठेवली. मामाना पालकत्व दिलें. शेजाऱ्यांना सांभाळण्याची सूचना दिली. इतर स्नेह्यांची व नातलगांची निरवानिरव केली. पित्यासमान असलेल्या दूरच्या वृद्ध काकांना अखेरचें भेटून घेतलें. स्वतःच्या अंत्य संस्कारांची व्यवस्था करून ठेवली...आपल्या मरणानें जगाला कमींत कमी

दुःख व्हावें हा विचार !—अन् प्रत्यक्ष कालदूतांनाहि कष्ट पडूं नयेत म्हणून त्याच्या झिजून जाणाऱ्या शरीराच्या दाराशीं त्यांचा प्राण आपण होऊन वाट पाहू लागला...

मग दिवस अन् रात्र ह्याना अर्थ उरला नाहीं. आजूबाजूच्या बघ्याची थक्क झालेली दृष्टि, पोराबाळांचे भेदरलेले केविलवाणे चेहरे, अन् धाय मोकलून आसवं ढाळणाऱ्या पत्नीची मूर्ति त्याना फार परकी, दूरवरची वाटू लागली. किती दिवस उरले आहेत, किती काळ कंठायचा आहे हें कळायची शुद्धि उरली नाहीं. फक्त तयार रहायचं, समोर जायचं, एवढी एकच भावना भरून राहिली......

अन् मग कार्तिक आला ! थंडीनें आखुडलेले दिवस नि कुडकुडलेल्या रात्री भरभर थिजून वितळून गेल्या. अमावास्येची अशुभ घटका उजाडली. सुशीलाबाईनीं देवांवर सतत अभिषेक सुरू केला अन् पंचप्राण एकवटून त्या पतीभोवती पहारा करू लागल्या. विसूभाऊंचा मेहुणा आला, चुलतभाऊ आला.—विसूभाऊंची समजूत करायला, सुशीलेला धीर द्यायला ! अन् आजूबाजूचे ओळखीचे लोकहि भयचकितपणें पाहूं लागले.

अन् मग एक दिवस त्याचा मेहुणा त्यांना जोरानें हलवून ओरडून म्हणाला, " आतां तरी माणसासारखं वागा ! अमावास्या उलटली !... तुमचं भविष्य खोटं ठरलं ! वेळ टळली !..."

विसूभाऊंना अर्थबोध व्हायला वेळ लागला. पण मग ते विलक्षण बावरले. अमावास्या गेली ? कार्तिक सरला ? भविष्य खोटं ठरलं ? आपण जिवंतच राहिलों ? मेलों नाहीं ?—खरच, ते जिवंत होते ! हातपाय हालवूं शकत होते ! खरंच मुदत संपली होती. मरणाचं भय टळलं होतं. अशक्य कोटींतली गोष्ट घडली होती ! केवढा विलक्षण चमत्कार !

मेहुणा नि चुलतभाऊ विसूभाऊंना इहलोकांत आणीत होते. शेजारी डोकावून पहात होते. कुसुम नि माधव जवळ सरकूं पहात होतीं. अन् सुशीलाबाईंचा आनंद दाही दिशांत मावत नव्हता. पैठणी नेसून त्या सत्यनारायणाच्या पूजेची तयारी करीत होत्या.

विसूभाऊंचा पुन्हा पुन्हा विश्वास बसत नव्हता. मृत्यूच्या किती नजीक गेले होते ते ! सर्व पाश तोडून, सर्व भावना विसरून ते उभे होते—आणि काळ त्यांना झुकाडी देऊन पसार झाला होता. फलाटापाशीं गाडी थाबली नव्हती. खानेसुमारीच्या खतावणींतलं एक पान नकळत उलटलं गेलं होतं. अन् आतां विसूभाऊंना परतणं भाग होतं. अनिश्चित काळपर्यंत जगणं भाग होतं ! समाज, संसार, रोजची कर्मे, बायका–पोरं, ऊन–पाऊस, अन्न नि झोंप......

त्यांच्या भकास दृष्टीला घेरी आली. अन् मग अचानक अश्रुधारा ओघळूं लागल्या. कित्येक दिवसांनीं ते आज रडूं लागले. कित्येक दिवसांनीं त्यांना ताप भरला.

घरांत आनंदोत्सव चालला होता. ब्राह्मणभोजनं झडत होतीं, पंचपक्वान्नं तयार होत होतीं, नवस फेडले जात होते. कार्तिक टळल्यावर आता दिवाळी साजरी होत होती.

अधू झालेल्या मनाने विसूभाऊ सारं पहात होते. पक्वान्नांचा सुवास त्यांच्या सुंद नाकाशीं घोंघावत होता. पत्नीची तृप्त नजर त्यांच्या बुबुळाशीं घोटाळत होती. घड्याळाची अखंड टिक्‌टिक् त्यांच्या कानात कुरकुरत होती. सगळीकडे आनंद पसरलेला, आशा भरलेली, जो तो आयुष्यात रंगून गेला होता. जणुं कुणीच मरणार नव्हतं ! विसूभाऊसुद्धां मरणार नव्हते ! ते जगणार होते. ते जेवणार होते. त्यांना भूक लागणार होती व ढेकरहि येणार होते. ते हंसणार होते, गप्पा मारणार होते. ब्रिझिकच्या डावात त्याना आवेश वाटणार होता. ताजीं वर्तमानपत्रं ते आतुरतेनें वाचणार होते. बाळाला कडेवर घेणार होते. अन् सुशीलेचे लाल झालेले गाल पाहाणार होते.

पण आजूबाजूचा उत्साह पाहूनहि विसूभाऊंना उठावंसं वाटेना ! पक्वान्नांचे प्रकार पाहून त्यांना जरासुद्धां भूक लागेना. सत्यनारायणाचा प्रसादसुद्धा घशाखालीं जाईना. कुसुमनें त्यांना घरच्या बागेंतलीं चाफ्याचीं फुलें दिलीं, त्यांचा त्यांना वासच येईना. ते खिडकींतून बाहेर पाहूं लागले. पण समोरचा रस्ता, आजूबाजूचीं घरें, ओळखीचीं माणसें त्यांना सारीं

परलोकांतलीं वाटूं लागलीं. अन् सुशीलेनें त्यांचा हात धरला तेव्हां त्यांच्या हाताचे स्नायूसुद्धां तसेच थिजलेले राहिले.

त्याचं मरण टळलं, पण ते माणसांत येईनात !

आरशात स्वतःचा चेहेरा पहातांच विसूभाऊ भयंकर दचकले. स्वतःचीच ओळख त्यांना पटेना. डोळे खोल गेलेले, गालाचीं हाडं वर आलेलीं अन् दाढी बोटभर वाढलेली. त्या डोळयात कसलंच तेज नव्हतं, कसलाच भाव नव्हता. हात–पाय लांब व वांकडे झालेले नि शरीर नुसतं फासळ्यांनीं भरलेलं. एखाद्या भुतासारखे दिसत होते ते !

...भूत ! मढं ! आरशांतलं प्रतिबिंब, घरांत बसवलेलं शरीर हें विसूभाऊंचं मढं आहे, भूत आहे. अमावास्येच्या अपरात्रींच विसूभाऊ वारले. त्यांच्या आत्मा उडून गेला. आतां वावरतो आहे तो फक्त त्यांचा पेंढा भरलेला सागाडा...

विसूभाऊ अधिकच भकास झाले. आंवरून ठेवलेल्या, आंखून दिलेल्या स्वतःच्या संसारात असं भूत होऊन वावरणं त्यांना नको होतं. ते सारखे ओक्साबोक्शीं रडूं लागले. म्हणूं लागले, “ मला इथं राहायचं नाहीं. मला जाळा, अग्नि द्या—”

आतां मात्र अनर्थ झाला ! विसूभाऊंचं वर्तन पाहून कुणाला कांहीं सुचेना. आनंदाचे गजर, देवाचे नवस एकदम बंद पडले. विसूभाऊंना फुलवायला, खुलवायला सारीं जणं आटोकाट यत्न करूं लागलीं, मेहुण्यानें त्यांना बाहेरच्या बागेपर्यंत हात धरून हिंडवून आणलें. भावानें रेडिओ आणून जगांतल्या गंमती सुनावल्या. जोश्यानें त्यांना लहानपणच्या आठवणी व पुढच्या आकांक्षा सांगून पाहिल्या, पण विसूभाऊंना कसलीच ओढ, आतुरता उरली नव्हती. हें आपलं नाहीं, हें आपल्याला नको ! हें संपलं आहे, हें आपण स्वीकारणार नाहीं, आपण मरणार...मरणार !...

सुशीलाबाईंना सुचेनासं झालं ! सारं पुण्य पणाला लावून त्यांनीं आपलं सौभाग्य टिकवलं होतं ! फक्त अमावास्या उतरेपर्यंत हें व्रत आहे अशी त्यांची भावना होती. पण आतां मार्गशीर्ष मार्गे पडूं लागला !

भविष्यकाळाचं एवढं भय वाटलं नाही, पण भूतकाळाच्या ह्या घडामोडीनं त्यांच्यावर आकाश कोसळूं लागलं.

कशी समजूत घालायची?–मृत्यूचा एवढा पगडा बसलेला कसा उठवायचा?—'कुणी म्हणालं, 'मांत्रिक आणा, झपाटलं आहे त्याना!'—मेहुण्याचा विश्वास नव्हता, पण मांत्रिक आला.

मंत्रतंत्र, गंडदोरे, भूतपिशाच्च—घरीं एकच गर्दी उडाली. पण विसूभाऊ सर्व पिशाच्चांच्या पुढें गेले होते, अन् त्यानीं एकच मंत्र धरला होता, "मी मरणार—मी मरणार—"

मंत्रांच्याबरोबर मात्रा आल्या. पोटांत घ्यायचे काढे, अंगाला लावायचे लेप, एक ना दोन. कुठून कुठून औषधी वनस्पति आणण्यांत शेजारचा जोशी झिजून गेला. आयुर्वेदात म्हणे यावर औषध होतं. अन् वाटेल तें व्रत पाळायची आणि लागेल तें औषध आणायची सर्वांची तयारी होती. आणि हें सारें चालू असतांना चुलतभाऊ डॉक्टरांना आणूं लागला. घरचा डॉक्टर, हृदय तपासणारा डॉक्टर, रक्त तपासणारा डॉक्टर, मेंदू तपासणारा डॉक्टर, आणि मानसशास्त्र जाणणारा तज्ज्ञहि—आपापल्या परीने जो तो उपचार करीत होता, प्रयोग करीत होता...

पण विसूभाऊंना कशानेच गुण येईना. पुराचे पाणी झपाट्यासरशीं ओसरून जावं तसं त्याचं आयुष्य निष्प्राण झालं होतं. पंचा नेसून ते न जेवतां, न झोंपतां अडगळींत बसून रहात. त्यांच्याकडे बघणंहि भीतिदायक वाटे. मुलं तर झोपेतहि दचकून उठत अन् सुशीलाबाईंनाहि जवळ जाणं जड वाटे.

अखेर मेहुणा कंटाळला व बहिणीच्या नशीबाला दोष देत निघून गेला. चुलतभावानेहि 'विश्याला वेड लागलंय्' असं ठरवून काढता पाय घेतला. मांत्रिक थकले, मात्रा संपल्या, औषधांचे शोध अपुरे पडले. विधवा झाल्यावर सुशीलेला उपयोगी पडेल म्हणून ठेवलेली रोकड विसूभाऊंच्या वेडांत खर्च झाली. सुशीलाबाईंना काय करावं कळेना! मृत्यूला आळवणाऱ्या जिवंत नवऱ्याला कसं जागं करावं कळेना! अखेरचं अवसान आणून त्यांनीं विसूभाऊंना आपल्या चुलतसासऱ्याकडे आणलें.

खेडेगावांत एकीकडे रहाणारा विसूभाऊंचा वृद्ध काका आपल्या पुतण्याची अवस्था पाहून रडूं लागला. धडधाकट, तरणाताठा अन् सुखी, संसारी विश्वनाथ!—अन् काय ही विलक्षण अवस्था! मृत्यूचं दर्शन इतकं उग्र असतं? मृत्यूचा ध्यास इतका असाधारण असतो?—सत्तर वर्षांच्या त्या वृद्धाला तर आयुष्याची अजून ओढ उरली होती. चिवटपणें जगत होता तो. अजून मिळेल तितकं जगणार होता...

वेदान्त, आश्वासन, जरब, आकर्षणं!—म्हाताऱ्यानें नाना तऱ्हेनें विसूभाऊला आळवलं. चुलत्यापुतण्याचं विलक्षण प्रेम होतं एकमेकांवर!—पण आता विसूभाऊंना त्याची आठवणहि उरली नव्हती. हा सत्तर वर्षांचा थेरडा स्वतः काळापासून तोंड लपवून खुशाल जगतो आहे, वर माझीहि धिंड काढूं पहातो आहे! का हे लोक आयुष्याला असे लोचटासारखे चिकटून असतात?—काय ह्या खेळांत ह्याना स्वारस्य वाटतें?—विसूभाऊ विटून गेले. अधिकच वेड्यागत करूं लागले.

चुलत्यापुतण्यांची आतां चढाओढ सुरू झाली. म्हाताऱ्यानें जंगलांतली दुर्मिळ वनस्पति महत्प्रयासानें आणून पाजली, वेड पळावं म्हणून विसूला भरमसाट दारू पाजली, पुनर्जन्माचं नाटक केलं. आततायी, अशक्य कोटींतले, सारे यत्न केले, पण त्या विलक्षण उपचारानीं विसूभाऊ अधिकच वेडेचार करूं लागले. ते रडूं लागले, किंचाळूं लागले, सुशीलेच्या गळ्यांतलें मंगळसूत्र तोडूं लागले, भर रात्रीं स्मशात जाऊन बसूं लागले...

अखेर म्हातारा आजारी पडला! अन् त्याचें हें भाग्य पाहून विसूभाऊंचा अधिकच भडका उडाला!

कांहीं मार्ग उरला नव्हता म्हणून सुशीलाबाई कांहीं दिवस तिथें राहिल्या, अन् मग दुसऱ्या गांवीं नवऱ्याचें लोढणें घेऊन गेल्या. तेथून तिसऱ्या, मग चवथ्या. दूरदूरच्या शहरांत, एका बाजूच्या खेड्यांत, तीर्थांच्या जागीं, साधूंच्या मठाजवळ......

विसूभाऊंना जगायची इच्छा नव्हती, पण त्यांना मरण येत नव्हतं. असंख्य उपचार अन् प्रेमाचा पहारा त्याना जगत ठेवत होता, तेवत ठेवत होता! आतां मरणाचं भविष्य, खोटं भविष्यसुद्धां कुणी सांगत नव्हतं, प्रत्येक

नजर, प्रत्येक प्रयत्न, प्रत्येक क्षण त्यानी जगात रहायची जाणीव करून देत होता. त्यांचें शरीर बाहेरून नातलगांच्या नजरांनी नि आंतून औषधानीं लपटलें होतें. पंचेद्रियें फुलवायला नवीं माणसं व नवा मुलूख दाखवला जात होता. जगण्याखेरीज दुसरं काही करायला अवसर ठेवला नव्हता. अनिश्चित कालपर्यंत मुकाट्याने जगत रहायचं एवढंच ठरलं होतं. फक्त जगणं, जिवंत रहाणं, मृत्यूपासून लपणं, मृत्यूला विसरणं......

× × ×

आणि कुठल्यातरी परप्रातात नेलेले विसूभाऊ बायकोचा, डॉक्टराचा, औषधांचा-पहारेकऱ्याचा, सर्वांचा, डोळा चुकवून एका रात्रीं भर अंधारांत, भर पावसांत पळाले, वेडयासारखे सैरावैरा धावत जंगलात घुसले, अन् एका ओसाड विहिरींत त्यानीं उडी घेतली.



## सौभाग्य : ११

संध्याकाळीं सहा वाजून गेल्यावर मथुरा बिऱ्हाडीं परतली. सकाळीं चार घास खाऊन भर उन्हांत घराबाहेर पडली ती आतां उन्हं उतरल्यावर उपाशी मनानं परतली. जातांना औत्सुक्य, आनंद आणि अनेक आशादायी भाव मुखावर नाचत होते. आता आली तेव्हां चेहरा शांत, सौम्य व बराच शून्य झाला होता. असा बदल कां झाला हें तिचं तिला नीट समजलं नव्हतं—दुपारभर कळलं नव्हतं नि घरीं परततांनाहि उमगलं नव्हतं. घराला कुलूप होतं. सकाळीं बिऱ्हाडाबाहेर पडतांना अनेक संमिश्र भावना मनांत जमल्या असतांना तिनं कसंतरी कुलूप लावलं होतं. आतां कुलूप उघडताना—क्षणार्धांत मथुरेच्या मिठी पडलेल्या मनांत एक जुनी आठवण कळ उघडण्यासारखी आली...

संध्याकाळीं सहा वाजून गेल्यावर सदाशिवराव घरीं परतले. मथुरा घरीं नव्हती; दारांतहि नव्हती. बिऱ्हाडाला कुलूप लावून शेजारणीकडे बसायला गेली होती. लोणचं घालण्यावरून, स्वेटर विणण्यावरून, शिकणाऱ्या मुलींच्या नखरेपणावरून गप्पा सुरू झाल्या; नि रंग असा चढला की वेळेचं भान उरलं नाहीं. असं सहसा होत नसे; पण जमलेल्या जणींत मथुराच जरा शिकलेली होती अन् त्यामुळं बोलण्याचा बराच वांटा तिच्याकडे आला होता. मथुरेचं बहरात आलेलं भाषण चाळींत खेळणाऱ्या एका पोरानं टाळ्या वाजवून थांबवलं. सदाशिवराव त्रासिक मुद्रेनं ताटकळून पिवळा हत्ती फुंकत उभे असल्याची वर्दी मिळाली; अन् मथुरा विलक्षण दचकून उठली.

मथुरा बिऱ्हाडाकडे आली ती धावत, धापा टाकीतच ! तिचा हुरहुरल्यासारखा चेहरा सदाशिवरावाची त्रासिक मुद्रा पाहून अधिकच शरमून गेला. कापऱ्या हातानं कुलूप निघालं अन् धडधडत्या हृदयानं चहाचं आधण चढलं.

कोट–टोपी खुंटीला अडकवून सदाशिवराव स्वैपाकघरात आले. तर्जनीनं त्यांनीं कपाळावरचा घाम पुसला, सिगरेटच्या थोटकाचा अखेरचा झुरका मारला अन् ते फतकाला मारून बसले. पाय न धुता स्वैपाकघरांत यायचं, सिगरेटची राख जागोजागीं करायची, दुसऱ्यासमोर घाणेरडा घाम पुसायचा हें मथुरेला अगदीं आवडत नसे. पण ती बोलली नाही. तिकडून ऑफिसांत यायच्या वेळेला आपण स्वागतासाठीं हसतमुखानं दारात नव्हतों ह्याच चुकीनं ती अर्धमेली झाली होती आणि तशांत......

तेवढ्यांत सदाशिवराव फुरंगटल्यागत म्हणाले, “ आम्ही कोण आतुरतेनं धावत घरीं येतो ! सातआठ तास कामाच्या ओझ्याखालीं जीव नकोसा होतो. इतके कष्ट करून घरीं यावं तर तुम्ही बेपत्ता ! आम्हीं मरमर राबायचं त्याचं चीज असं व्हायचं असेल तर–”

मथुरेला वाटलं आणीक काय अभद्र बोलणार हे ! त्यापेक्षां धरणी दुभंगली तर बरं होईल ! इतके कष्ट करून शिणून येतात हे पण आपल्याला एवढाहि सेवाधर्म पाळतां येत नाहीं. तिला आपली चूक कशी सुधारावी समजेना ! आधणात आणीक एक चमचा साखर टाकून तिनं चहा बनवला अन् कप भरून सदाशिवरावांच्या पुढं ठेवला.

सदाशिवराव आपल्याच नादांत होते. रुसलेली, रागावलेली चर्या तशीच कायम होती. चहाचा कप हातीं घेत ते म्हणाले, “ चहा तरी नीट केलाय् का ? सकाळीं घाईघाईनं चार शितं खाऊन जायचं तें संध्याकाळपर्यंत तसंच ! छे छे, कंटाळलों बुवा ह्या दगदगीला. नको हा त्रास नि नको हा संसार ! ”

चहाचे घोट पोटात जातांच सदाशिवराव एकदम उठले. कोट-टोपी हातांत घेत मथुरेकडे न पाहतांच म्हणाले, “ मी जाऊन येतों हं जरा ! अन् डाव पडला ईस्पिटाचा तर जरा उशीर होईल. ”

मथुरेनं नवऱ्याची कपबशी विसळून ठेवली. नवरा गेला तरी तिच्या मनातली खंत गेली नाहीं. बिचारे कसेबसे चार घास खाऊन कामावर जातात, सातआठ तास राबावं लागतं. किती काम पडत असेल कोण जाणे! वाढत्या अंधाराबरोबर मथुरेच्या मनाची खिन्नताहि वाढूं लागली. तिनं चूल पेटवली अन् त्यांना कोणती भाजी आवडते त्याचा अंदाज ती घेऊं लागली.——

× × ×

मथुरा कुलूप उघडून आत आली. मनाशीं क्षणार्धांत येऊन गेलेली आठवण चपला काढताना, चूळ भरताना, फिरूनफिरून घुटमळून गेली. त्या जुन्या जीर्ण जाणिवेनं तिला फारसा आनंदहि झाला नाहीं अगर वरवरचं दुःखहि दाटलं नाहीं. कसलीतरी निराळीच भावना येऊन गेली. त्याचं स्वरूप तिला समजलं नाही. चूलघरात ती गेली; पण चहा प्यायचा विचार आला तसाच निघून गेला. दुपारीं घेतलेल्या चहान चव पार बिघडून गेली होती तोंडाची अन् दुपारच्या दृश्यानी चेहऱ्यावरचे भावहि पालटून गेले होतं. संध्याकाळच्या क्षीण अंधारात मथुरेनं आरसा पुढं घेतला अन् आपल्या पांढऱ्या कपाळाकडे अन् फिकट चेहऱ्याकडे ती निरखून पाहूं लागली. हर्ष आणि खेद, आशा आणि निराशा ह्यांपेक्षां जे वेगळं वाटतय् तें ती आरशांत पाहायचा यत्न करूं लागली. पण एकाएकीं तिच्यापुढं एका फार जुन्या घटनेचं प्रतिबिंब प्रकट झालं......

सदाशिवराव ऑफिसांतून आले आणि त्यांचं चहापान व्यवस्थित झालं. परंतु मथुरेच्या मनाला कापरं भरलं होतं तें कमी झालं नाहीं. नवऱ्याचा तिला जाच होता, त्रास होता असं नाहीं. पण कांहीं कांहीं गोष्टी मोकळे-पणीं बोलायला तिला भारी भय वाटे. आज पहिली तारीख होती, पगाराची तारीख होती. अन् गेले चारपांच महिने नव्या बांगड्या बनवायची मथुरेची इच्छा अपुरी राहिली होती, ती उफाळून आली होती.

चहाचीं भांडीं विसळताना मथुरा मनांत पैशाचे हिशेब करीत होती. दूधवाला, कोळसे वाला, घरभाडं, मोलकरीण——सर्व देणीं निपटूनहि थोडेसे पैसे उरतील. खेरीज पोस्टांतली शिल्लक. बांगड्या सहज दुरुस्त होतील!

मथुरा हात पुशीत हसतहसत बाहेरच्या खोलींत आली अन् तपकिरीच्या चिमटी नाकांत कोंबणाऱ्या नवऱ्याला म्हणाली "पगार झाला असेल आज!"

सणसणीत शिंक देत सदाशिवरावानी मथुरेकडे रोखून पाहिलं. त्यांना अंदाज आला अन् एकदम त्याचा चेहरा गंभीर झाला. ते म्हणाले, "अर्थात्! तीस दिवस काय फुकट हाडाचीं काडं करतों होय? अन् पगार पुरा मिळाला आज."

मथुरेनं आश्चर्यचकित होऊन म्हटलं, "म्हणजे?"

सदाशिवराव खुद्कन् हसले. पण मग त्याची मुद्रा पोक्त झाली. जबाबदारीच्या आठ्या त्याच्या कपाळावर रेखल्या गेल्या. काळजीनं त्यांच्या भुवयांखालचीं काळीं वर्तुळं ठळक केलीं. अन् त्यांची हिकमती जिव्हणी म्हणाली,

"तुला काय कळणार ऑफिसच्या भानगडी? हजाहजाराची कॅश सारखी मोजावी लागते. हिशेब, ताळे, आकडेमोडी, सह्या–साऱ्या गुंतावळ्यांत डोकं शाबूत ठेवणं म्हणजे चेष्टा नाहीं! पैचा फरक झाला की पगारांत कपात आलीच. चोवीस तास सुरी लटकत असते डोक्यावर!"

मथुरा खिळून राहिली. आपले पती इतकं जबाबदारीचं, जोखमीचं काम बिनधोक करतात ह्याचा तिला अभिमान वाटला. खरंच केवढे मोठे आहेत हे! तरीपण बांगडया—

ती म्हणाली, "ह्या महिन्याला सारीं देणीं देऊन बरीच शिल्लक उरेल. ह्या बांगडया झिजल्या आहेत. घाट बदलून—"

"किती असंतुष्ट आहेस तूं! अग हें सारं चाललंय् कुणासाठीं? आम्ही मरमर राबतों आहोंत. आत्ताच तुला सांगितलं, कीं एक पाय तुरुंगांत–"

"इश्श, भलतंच काय बोलणं!"

"मग काय तर! आम्ही काय विवंचनेंत असतों अन् तुमचे कसले खुळे हट्ट सुरू असतात! मागच्याच महिन्याला तुला लुगडं घेतलं."

"हो, माझंच चुकलं!"

खालच्या मानेनं मथुरा खोटी हसली. सदाशिवरावहि हसले. पण मनापासून अन् मान वर करून! मग कोट-टोपी घालीत ते म्हणाले,

" क्लबमधून यायला उशीर होईल जरा ! सर्वांचेच पगार झाले असणार आज ! तेव्हा पत्त्यांची बैठक लवकर संपणार नाही. "

सदाशिवरावांची स्वारी दिसेनाशी होईपर्यंत भरल्या डोळ्यांनी मथुरा तिकडे पाहात राहिली. हिशेब, ताळे, आकडेमोडी, सह्या, एक पाय तुरुंगांत ! मथुरेचं ऊर भरून आलं. कचेरींतली नोकरी म्हणजे राज्य चालवण्याहूनहि अवघड. पगार मिळणं, पैसे कमावणं किती कठीण, कष्टाचं !—अन् आपला स्वामी हें सारं सहन करतो. एवढ्या दगदगीनंतर विसाव्यासाठीं त्यांना क्लबमधे पैसे लावून खेळावं लागतं; पण हें आपल्या ध्यानांतहि येत नाहीं व आपण लुगड्याचा, बांगड्यांचा हट्ट घेऊन बसतों.

पलंगावर रेलून, नवरा कचेरींत काम कसं करीत असेल ह्याचा अंदाज मथुरा घेऊं लागली. फाईली, टेबलं, टाईपरायटर्स, पट्टेवाले, तिजोऱ्या, वरिष्ठांचे हुकुम अन् कारकुनांची कुजबुजणीं अन् त्या साऱ्या पसाऱ्यांत आपले हे एका मोठ्या टेबलाशीं धडाडीनं आकडेमोडी करीत आहेत......

× × ×

मथुरा आरशापासून दूर झाली अन् तिनं दिवा लावला, चूल पेटवली नि चार घास खाल्ले. फार दिवसापूर्वीची नेमकी तीच सामान्य घटना आज कां स्मरावी अन् मनांत धुमसत राहावी हें तिला पूर्णपणें कळेना. सदाशिवरावांना जाऊन सहा वर्षे लोटलीं होतीं अन् मरण्यापूर्वीं त्यांनीं बांगड्या बदलून आणल्या होत्या—त्याहि त्यांच्या मागोमाग मोडाव्या लागल्या होत्या. जुन्या अलंकाराच्या नि जुन्या संसाराच्या आठवणी अकारण काढायचा का काळ उरला होता ? पण नाही म्हटलं तरी ह्या आठवणी कां उगवतात ! अन् त्यांसह नेहमीची हुरहुर नि नेहमीचे अश्रू कां येत नाहींत ? मथुरेनं आपल्या कोरड्या डोळ्यांवरून बोट फिरवलं, कोरड्या ओठांवरून जीभ फिरवली अन् दिवा मालवून ती पलंगावर पडली. मऊ उशींत माथ टेकतांच तिच्या मिटलेल्या डोळ्यांसमोर पुन्हां एक स्मृति स्वप्नासारखी वावरूं लागली......

बरीच रात्र झाली तरी सदाशिवराव परतले नव्हते. मऊ उशींत माथ टेकून मथुरा वाट पाहात होती. क्लबमधे ते कधीकधी रमतात हें तिल

ठाऊक होतं, तरीहि ती त्यांची वेड्यासारखी वाट पाहात होती—सवयीमुळं, सेवाधर्मामुळं !

त्यांतून आज तिचं डोकं दुखत होतं ! अन् अंगहि तापणार की काय असं वाटत होतं. भरभर काम आवरून ती अंथरुणावर आडवी झाली होती; परंतु सदाशिवराव परत येईपर्यंत जागं राहणं भाग होतं.

तेवढ्यांत सदाशिवरावांची चाहूल लागली. मथुरेनं त्वरेनं दार उघडलं. आंत येत सदाशिवराव म्हणाले, " मला जेवायचं नाहीं. खूप खाणं झालंय् बाहेर !...तूं घे जेवून. "

स्वैपाकघराकडे निघालेली मथुरा उंबरठ्यावरच थबकली. अन्नाची विल्हेवाट कशी लावायची ह्याचा तिनं क्षणार्धात विचार केला. मग आत जाऊन तिनं सारी आवराआवर केली.

ती बाहेर आली तेव्हां सदाशिवराव तिची वाट पाहात आहेतसं तिला भासलं ! ते म्हणाले, " आँ ! जेवली नाहीस तूं ? "

" नाहीं, मला भूक नाहीं. "

विलक्षण प्रेमळपणानं ते म्हणाले, " वा वा, असं कसं ? आम्ही जेवलों नाही म्हणून तुम्हीं उपाशी राहायचं हा कुठला न्याय ? चल. "

" खरंच नको अन् मला बरंहि वाटत नाहीं. "

सदाशिवरावांचा चेहरा खर्कन् उतरला. ते कंटाळ्यानं म्हणाले, " काय होतंय् ? डोकं दुखतंय वाटतं ? मग ॲस्प्रो नाहीं घ्यायचं ? कां तेंहि आम्हींच सांगायला हवं ? "

मथुरेनं 'विशेष कांहीं होत नाहीं' असा अविर्भाव केला अन् ती अंथरुणं पसरूं लागली.

सदाशिवरावांनीं अस्वस्थपणें फेऱ्या घातल्या. वेडीवाकडी शिट्टी वाजवून अर्धी-मुर्धी लावणी घोळवली. मग मथुरेकडे वळून ते म्हणाले, " मी आज किती आनंदात आहे ! अन् तूं मात्र—"

मथुरेनं उशावर अभ्रे सरकवीत प्रश्नार्थानं पाहिलं. तिच्या डोळ्यांतला तो भाव पाहून सदाशिवराव खुलून म्हणाले,

" माझ्या बढतीचं नक्की झालं ! पुढच्या महिन्याला वरची ग्रेड मिळणार ! "

" खरं म्हणतां हें ? "

" मग तुला काय वाटलं ? शंभर कारकून आहेत हापिसात. पण त्यातून वर सरकवायला डोकं असत एखाद्याजवळच. "

नवऱ्याचा तो डौल,-बोलण्याची ढब, नजरेतला भारदस्तपणा—मथुरेला मीठमोहऱ्याच आणाव्याशा वाटल्या ! पण डोक्यांतली कळ थांबली नव्हती; अन् तिचा चेहरा तसाच उदास राहिला.

सदाशिवराव तिच्या नजीक आले. तिच्या चेहऱ्यावर भीतीचे भाव उमटून गेले. घोगऱ्या स्वरात सदाशिवराव म्हणाले,

" आणि बांगड्यांचं काय, कुड्यासुद्धा करूं ! ग्रेड काय, कष्ट काय, सारं तुझ्यासाठीं करायचं ! साहेबाचं माझ्याखेरीज पानदेखील हालत नाहीं. गुप्त फायली, महत्वाचे कागद सारे माझ्या हाताखालनं जातात. हा मान, हा मोठेपणा कुणासाठीं मिळवायचा ? तुम्ही सुखी व्हावं म्हणून—"

" पण मी आहें ना सुखी ! "

" मग चेहरा अजून हसरा का होत नाहीं ? तुमच्यासाठीं आम्हीं दिवसभर राबायचं, जिवापाड कष्ट उपसायचे अन् घरी येऊन एवढंहि सुख—"

" असं काय बोलायचं ! "

मुखावर खोटं हास्य आणीत मथुरा विचार करू लागली. इतका हुषार, असामान्य स्वामी शोधूनहि सापडायचा नाहीं. मग आपण इवलीशीं दुःखं विसरून त्याला हवं ते, हवं तेव्हा नको सुख द्यायला ? आपलं तेच कर्तव्य अन् तेच जीवितकार्य.

× × ×

मथुरा नकळत पलंगावरून उठली. चार वर्षांच्या वैधव्यदशेत बऱ्या-वाईट आठवणी आल्या त्या पतीबद्दल अभिमान अन् आत्मीयता घेऊनच आल्या. त्या साऱ्या काळांत संकटं सहन केली, कष्ट केले, शिक्षण घेतलं, पण ती श्रद्धा अन् तो आदर कधीच कमी झाला नाहीं. मग

आजच असं चुकल्यासारखं, ढासळल्यासारख काय वाटतंय? मथुरेनं खिडकी उघडून चौकटींतून चांदणं निरखल. दिवा लावून हृदय जागं करायचा यत्न केला. समई पेटवून पतीच्या फोटोकडे भक्तिभावानं पाहायचा प्रयत्न केला. पण कुठल्याहि उजेडाच्या आधारान मनाला आलेल्या त्या अनुभवाचं आकलन नीट होईना. खर म्हणजे ह्या प्रकाशापेक्षा तिनं दुपारच्या रखरखीत सूर्याच्या साहाय्यान जे पाहिल त्याचेच तेजकण तिच्या हृदयात फुलत होते. पाहतापाहता पेटलेल्या वणव्याप्रमाणं दुपारच दीर्घ दृश्य मथुरेच्या मनांत तळपू लागलं......

सकाळीं दहा वाजायच्या आतच मथुरेनं सैपाक उरकला नि घाईनं चार घास घशाखाली घातले. औत्सुक्य, आनंद आणि अनेक आशादायी भाव तिच्या मुखावर नाचत होते. त्याच धांदलीनं तिनं बिऱ्हाडाला कसंबसं कुलूप लावलं अन् ती लगबगीनं निघाली. हातात नोकरी मिळाल्याचा हुकूम, हृदयात नोकरीबद्दलचा धडधडाट अन् डोळ्यात नोकरीसंबंधीचीच उत्सुकता!

कळवलेल्या वेळेच्या आधीच ती कचेरींत पोचली. ऑफिसात जायला वेळ साधावी लागते हें तिला चागलंच ठाऊक होतं. तिनं सुस्कारा सोडला व ती वरिष्ठांची वाट पाहात राहिली. थोडसं शिकल्यानंतर अन् थोडेसे प्रयत्न केल्यावर लगेच नोकरी मिळाली हा आनंद होत होता अन् कचेरीत जबाबदारीचं, जोखमीचं काम झेपेल की नाहीं ह्याची धास्ती वाटत होती.

वरिष्ठ आले; पण मथुरेला लगेच भेट घेतां येईना. पट्टेवाल्याचं दुर्लक्ष, नंतर मग्रूरी अन् मग बक्षिशी. साहेबानी मथुरेला नीट न्याहाळली अन् काम समजावून दिलं. अनेक कारकून ओळीनं बसले होते; त्यांत एका टेबलाशी ती बसली अन् कागद पाहू लागली.

एकएक कागद—अन् एकएक फाईल पाहतांपाहता मथुरा त्यात रमली अन् मग हळूहळू कामाची पद्धति तिच्या लक्षात आली. जे ठरवून दिलं होतं, आखून दिलं होतं, तें साध, सोपं काम होतं. आपण उगाचच भीत होतों ह्या भावनेन मथुरा हसली अन् थोड्या वेळात तिनं साऱ्या दिवसाचं काम संपवून टाकलं.

सारा तास दीड तासच संपला होता. मथुरेनं टेबलापुढची नजर चोहोकडे वळवली. चारी बाजूंना टेबलाचा चक्रव्यूह अन् कागदपत्राच्या पलटणी. चौफेर पहावं तिकडे कारकून काम करीत बसलेले. तरुण, पोक्त, म्हातारे......

मथुरेला एकदम नवऱ्याची आठवण आली. सदाशिवराव असेच एखाद्या टेबलापाशीं बसत असले पाहिजेत. मथुरेचं ऊर भरून आलं. तिनं मान खाली घालून काहीं कागद चाळले. फाइली परत लावून ठेवल्या अन् टीपकागदाशीं चाळा करीत ती पुन्हा सर्वत्र पाहूं लागली.

तिच्या शेजारचा पोक्त कारकून फाइलींत डोकं घालून घोरत होता. त्याच्या शेजारचा दोनदोन सेकंदानीं तपकीर ओढत शिकत होता. उजव्या बाजूचा तरुण कारकून येणारे कागद सरळ बाजूच्या ढिगात लोटून देत होता अन् कुठलीशी कादंबरी चोरून वाचीत होता. समोरच्या टेबलापासचा लांब मिशाचा व पिंग्या डोळ्याचा इसम तीनतीनदा साहेबाला भेटून येत होता—अन् ह्याव्यतिरिक्त त्याला काम नव्हतं. एकदोन मात्र कामात गुंतले होते; पण त्याच्या डोक्यात घोटाळा झाला होतासं दिसत होतं. ते सारखे पुटपुटत होते नि लिहिलेलं पुनःपुन्हा खोडत होते अन् बाकीचे......

मानेवर खडा ठेवून अगर अगदीं मनःपूर्वक असं कुणीच काम करीत नव्हते !

मथुरेला विस्मय वाटला. तिनं स्वतःपुढचे कागदपत्र चाळले. मनासारखं आणिक काय काम करायचं, असं तिला क्षणमात्र वाटलं. तिनं आळसावल्यासारखं केलं अन् घड्याळाकडे पाहिलं. सारे दोन तासच झाले होते. वेळ कसा जाणार तिला समजेना. खुर्चीत रेलून ती पुन्हा सभोवार पाहूं लागली.

तपकीर ओढायला, पाणी प्यायला, चहा प्यायला—अनेक सबबींखाली दरेकजण तीनतीनदा बाहेर जात होता. 'आबासाहेब, जरा तपकीर द्या हो—जर्दा आण रे रामजी—पुन्हा एकदा चहा फिरवा—ठेवा हो अर्जंट नाहीं ते एवढं—काम करून काय मिळवणार आहात एवढ !' अनेक आवाज कानांवर पडत होते.

काम कसं नि किती होत होतं हें ज्याचं त्याला माहीत ! वर्षानुवर्ष आखून दिलेलं ठराविक काम करतांना जो तो आव आणत होता तो मात्र अपूर्व होता. बुद्धीचा अंश नाहीं नि घामाचेहि थेंब नाहींत. निर्जीवपणे, लळतलोंबत सारेजण वेळ वेचीत होते. जोखीम नाहीं, जबाबदारी नाही ! कष्टताप नाहीं, शीण नाहीं...

पट्टेवाल्यानं हळूच घड्याळ पुढ सरकवलं ! अन् त्यामुळं वेळ लवकर संपला. कागदांच्या नि कारकुनाच्या कारखान्यातून बाहेर आल्यावर मथुरेला हायसं वाटलं. पण त्या सुस्काऱ्यात समाधान नव्हतं ! जोखमीचं काम केल्याचा आनंद, मरमर राबल्यावर येणारा शीण, घरीं जाऊन जिवाला रिझवावं ही ओढ–काहींच वाटत नव्हतं तिला ! तिचा चेहेरा शांत, सौम्य व बराचसा शून्य झाला. त्याच तालात ती बिऱ्हाडीं परतली.

मथुरेचं मन खडबडून जागं झालं. दुपारचीं दृश्यं दीर्घ काळ दिसत राहिलीं. त्या रखरखाटात तिच्या मनांत निर्माण झालेल्या नव्या भावनेचं सत्य स्वरूप तिला समजूं लागलं. केवढी फसवणूक, केवढा कट ! मथुरेचा चेहरा स्तिमित झाला. मग तिला राग आला अन् अखेर ती स्वतःशीच हसली. कामाच्या नावाखाली हे लोक कचेरींत असा वेळ दवडतात तर ! तपकीर, तंबाखू, चहा, चुगल्या, पुस्तकं, पत्ते ! कामाचे कागद दूर लोटायचे नि साहेबासमोर जमेल तितकं नाचायचं ! मुख्य म्हणजे साधं काम अवघड करून ठेवायचं !–अन् हा घोळ घातल्यावर दमल्याचा, शिणल्याचा अवतार धारण करून घरीं यायचं, बायकापोरावर गुरकावायचं, दम द्यायचा, थापा मारायच्या, मिरासदारी गाजवायची ! घरात हक्काच्या बायकोकडून ओवाळून घ्यायचं; अर्पण करून घ्यायचं ! सहा तास कचेरींत माशा मारायच्या नि उरलेला वेळ बायकोला बनवून तिचा जीव नकोसा करायचा !...मथुरेनं खिडकी लावून चादण्या दृष्टीआड केल्या, दिवा फुंकून संसारावर सावली पसरवली. निराजन फुंकून फोटोंतल्या नवऱ्याची दांभिक मुद्रा नाहीशी केली अन् सौभाग्य सरल्यापासून आज प्रथमच ती शांत मनानं तात्काळ झोपीं गेली.

• • •

## कारकुनांच्या बिऱ्हाडांतून— : १२

कारकुनाच्या बिऱ्हाडातून देवघरांतल्या देवापेक्षां कोनाड्यातल्या घड्याळाची पूजा अधिक अगत्याची असते. पहांटे जाग आल्यावर प्रथम आकड्याच्या भस्माचे पट्टे ओढलेल्या ह्या गोल तोंडाच्या मूर्तीचें दर्शन घ्यायचें. मग सारी सकाळ त्याचाच जप करीत पाणी भरायचें, झाडलोट करायची, अन् अन्न शिजवायचं! नऊ वाजेपर्यंत स्वैंपाक तयार होण्यासाठीं ह्या अखंड टिकटिकणाऱ्या अवताराची करुणा भाकायची. जेवण आटोपून कचेरींत जाण्याची वेळ साधली कीं, ह्या दोन्ही भुजा जुळत जाणाऱ्या मूर्तीपुढें हात जोडून सुस्कारा सोडायचा! कीं अखेर देव नवसाला पावला. एक दिवस जरी साडेनऊला जेवण तयार झालें नाहीं तर पुढें कायमचे उपवास घडण्याची भीति. एकादा दिवस दहाचे पुढें घरीं राहिलें तर सर्वांना घरदार सोडावें लागण्याची धास्ती. चार घास पोटांत ढकलून ऑफिसची वेळ साधणें हेंच आयुष्यांतलें मोठें कर्तव्य होतें. त्यावरच संसाराचें स्थैर्य अवलबून होते. त्यासाठींच चाळीचाळींतून प्रत्येक कुटुंबात अशी आराधना सुरू असे.

नानाच्या बिऱ्हाडात हाच सकाळचा सोहळा आज पंधरा एक वर्षे सुरू होता.

आजहि उमाकाकू नेहमींच्या संवयीने सकाळीं सहाच्या आंत जाग्या झाल्या. संवयीनेच त्यानीं घड्याळाकडे डोळे फाडून पाहिलें. चूल सारवली, पाणी भरले, चहा तयार केला. मोठी सुमित्रा गाद्या गुंडाळून व झाडलोट करून आईला मदत करूं लागली. नाना उठायच्या आत मधू शहाण्या-

सारखा अभ्यासाला बसला. एकाद्या कारकुनासारखे नाना कडू चेहरा करीत जागे झाले. अधाशासारखा त्यांनी चहा ढोसला व आळसावून अंगावर पाणी घेतलें. आळीपाळीनें सर्वजण घड्याळाकडे दचकून पाहात होते व घर-काम उरकत होते. दादा म्हणाला, 'राहूं दे, मी साफ करतों दाढीचें सामान !' अन् त्यानें सायकलहि साफ करून तयार ठेवली. नानाचा खोळंबा न करतां सर्वांनीं स्नानं उरकलीं. नऊ वाजून गेल्याचें पाहिल्यावर सुमित्रेनें पाटपाणी केलें, आक्कानें वाढायला घेतलें, व उमाकाकूंनीं शेवटची पोळी लाटून तव्यावर टाकली. घाईघाईनें जेवणें उरकलीं तो साडेनऊ वाजून सात मिनिटें झालीं. नेहमीं तितकींच होत. नानांनी ऑफिसचा पोशाख केला, पत्नीनें दिलेली सुपारी तोंडांत टाकली, सुमित्रेनें दिलेला डबा घेतला व दादानें बाहेर काढलेली सायकल ढकलीत ते ऑफिसला निघाले.

नाना वेळेवर निघाले. सर्वांच्या तत्परतेचें, जागरुकतेचें सार्थक झाले. आतां दादाला सावकाश कॉलेजला जाता येईल, मधूला विटीदांडू खेळतां येईल, सुमित्रेला आरशापुढें नटतां येईल, शेजारणीशीं गप्पा मारीत उमाकाकूंना आराम करता येईल. उद्या सकाळपर्यंत सर्वांना मोकळ्या मनानें मजेंत जगतां येईल...

नाना निघाले. ऑफिसच्या वाटेने सायकल पिटाळूं लागले. गेल्या पधरा वर्षांच्या परिचयाने ही वेळ व ही वाट त्यांच्या संवयीची झाली होती. ह्या वेळेला दिसणारी ठराविक दृश्यें व ह्या रस्त्यावरील हरेक खड्डा. त्यांची साय-कल सहज रीतीनें वळणे घेत खड्डे चुकवीत होती व त्यांची नजर नकळत दुतर्फा फिरत होती. बाजारांतून जाणारा गजबजलेला रस्ता, वळणावर विरुद्ध दिशेनें येणारीं वाहने, चौकाच्या आधीं असलेला मोठा खड्डा, हिन्द हॉटेलशीं येणारा भज्यांचा वास, पोस्टापाशीं कमी करावा लागणारा वेग, तेथेंच उभा असलेला जीर्ण आंधळा, नंतरची नवी सडक, समोरच...

पण आज नाना नव्या रस्त्यापाशीच अचानक थबकले ! सायकलचा वेग कमी करून ते मागें पुढें पाहूं लागले. ऑफिसला जाणाऱ्यांची झुंबड उडाली होती. सायकली व बसेस. धांपा टाकीत, घड्याळें पहात जो तो धावत होता. या यात्रेंत आपल्या ऑफिसातलें आपल्या ओळखीचें कुणी

नाहीं ना, हें नानांनीं नीट निरखलें. अन् मग एकदम त्यांनीं बाजूच्या गल्लींत सायकल वळवली !

ऑफिसचा रस्ता सोडून आडमार्गाला आल्यावर नानांनीं कोरड्या हाताने कपाळावरचा घाम पुसला. सकाळपासून घेतलेलें सोंग संपलें म्हणून सुस्कारा टाकला. रात्रभर झोप नव्हती अन् सकाळपासून ऑफिसला वेळेवर जाण्यासाठी घरात घोळ घातला गेला होता. मुहूर्त साधण्यासाठीं एकाद्या नवरदेवासारखें नानाना नाचवले जात होतें अन् ते नाचले होते. अन् मग ह्या रस्त्याने त्याची धिंड निघाली होती...

मोकळ्या मनाने इकडे तिकडे पाहात नाना जाऊं लागले. गेले पंधरा दिवस ह्या वस्तीतून ते ह्या वेळेला असे जात होते. हेंहि वातावरण आता त्याच्या परिचयाचें झालें होतें. जणूं काय ते असे पधरा वर्षेच जात होते. अन् आता पुढेंहि कायमचे... ! नाना दचकले. अनेक विचार त्याच्या मनात चमकून गेले. त्याना वाटलें, वळावें. घरीं परतावें, किंवा ऑफीसच्या रस्त्यानें जावें. पण कसें जायचें, कसें वळायचें ! अन् भीतीनें भरलेल्या त्याच्या काळजांत सारखें कालवूं लागलें, आपण काय चालवले आहे हें ! किती दिवस असें चालणार ! चोरून, फसवून...

सायकल लटपटूं लागली व नानाना वाटलें, आपलें अवसान कोसळणार —त्यानीं सायकल सावरली, जोरानें पिटाळली. वसा खाकरून उसना उत्साह आणला.

एका इमारतीशीं ते उतरले. सायकलला कुलूप लावून डबा घेतला. तळमजल्यावरच्या एका खोलीचे दार खडखडवलें. त्यांच्या मनात पुन्हा अनेक विकल्प येऊन गेले. म्हणून ते अधिकच जोरानें दार खडखडावूं लागले. अन् हाकहि मारूं लागले, ' मनोहर, अरे मनाहर...'

दार उघडलें गेलें तशीं नाना आवेगानें आत आले. टेबलावर डबा ठेवून बाजूच्या खुर्चीवर त्यानीं बैठक मारली. सुटलो. आजचे नाटक संपलें...

मनोहरची झोपमोड झाली, पण तो परत पलगाकडे वळला नाहीं. मोरीवरून तोंड वगैरे धुवून आला अन् नानांना म्हणाला,

"काय–चहा घेणार का थोडा ?–"

"छेरे बुवा !–आत्ता जेवण झालंय माझं ! सुपारी सुद्धां संपली नाहीं तोंडांतली–"

मन्यानें एक बेसूर तान मारली व स्टोव्ह शिलगावला. नाना आजहि येतील असें वाटलें नव्हतें त्याला. तसें म्हणणें त्याच्या ओठावर आलें होते. पण नानांना वाईट वाटेल म्हणून तो गप्प बसला. आपल्या वरचा एके काळचा अधिकारी, आपल्या काकाचा लहानपणाचा स्नेही, आपल्याकडे अगतिक होऊन आसऱ्याला येतो, ह्या घटनेनें त्याला पुन्हां एकवार सुचेनासें झालें.

नानांनीं नको म्हणत मन्याच्या आग्रहास्तव चहा घेतला. चहाचें त्यांना व्यसनच होतें. वेळींअवेळीं त्याना चहाची तल्लफ येई. ऑफिसात तर किती वेळां चहा होई ह्याची गणतीच नव्हती. नानाना चहा पितांना ऑफीसची आवेगानें आठवण झाली. आत्ता कचेरींत कामाचा पहिला पूर सुरू असेल. साहेबाच्या टेबलावरची घंटा मिनिटामिनिटाला घणघणत असेल. पट्टेवाले फायली घेऊन फेऱ्या घालीत असतील. प्रत्येक कारकुनाचें टेबल कागद-पत्रानीं भरलें असेल. टाक कुरकुरत अलतील, माना वाकड्या झाल्या असतील. खुद्द आपल्या टेबलावर......

नानांनीं आंवढा गिळला व ते कावऱ्याबावऱ्यासारखे पाहूं लागले. दुर्दैवाच्या कुठल्या प्रवाहांत फेकले गेले होते ते ? अन् कसल्या काडीचा आसरा त्यांना घ्यावा लागला होता......

मनोहरनें पलंगावरची चादर ठाकठीक केली. जमिनीवरचीं सिगारेटचीं थोटकें गोळा केलीं. कोपऱ्यांतले कपडे उचलून ठेवले. अन् मग खोलीभर पाहात तो पलंगावर बसला. पंधरा दिवसांच्या सहवासाने नानाशीं तो अगदीं मोकळेपणानें वागूं लागला होता. पंधरा दिवसात वयातलें, विचारातले, अधिकारांतलें अंतर अगदीं नाहींसें झालें होतें. उलट नानाना चार शब्द सांगायचा समज त्याला आला होता.

तेवढयांत नाना म्हणाले,

"जमलं का तुझ्या जॉबचं ? कुठला मित्र भेटणार होता ना काल ?–"

“ अहो, तोंडापुरतें तें ! कसला कपाळाचा जॉब ! माझं जाऊं दे. तुमच्या परवाच्या अर्जाचं उत्तर आलं का ?–”

“ छे. त्याची मला कधीच आशा नव्हती. माझीं क्वॉलिफिकेशन्स ती काय अन् आतां वयहि नाहीं नि वशिलाहि नाहीं !–नोकरी सुटायच्या आधीं दुसरीकडे कमी का खटपटी केल्या ?–”

“ मला वाटतें, पुन्हा आपल्या साहेबाना भेटावें. पंधरा वर्षे नोकरी केलेल्या माणसांनीं जायचें कुठें एकदम ?—”

“ अरे, साहेब काय करणार ?–वरूनच रिट्रेंचमेंटचा रूळ आल्यावर ! अन् मी एकटा का आहें ? पंधरा वर्षांच्यापासून तुझ्यासारखे वर्षभर नौकरी केलेले एकूण चाळीसजण कमी झाले.”

“ पण मग करायचं काय पुढे ? दुसरीकडे थोडीशीही आशा नाहीं, अन्—”

रोजरोज होणारा हा संवाद नेहमींप्रमाणे नानाना उत्तर न सुचल्यानें आजहि असाच आटोपला. मन्या टेबलावर उरलेलीं सातआठ नाणीं पाहात बसला. नाना भिंतीवर टांगलेल्या कॅलेंडरच्या तारखा निरखू लागले.

नोकरी जाऊन पंधरा दिवस झाले होते. पंधरा वर्षें सरळ मार्गानें रखडत नेलेल्या संसाररथाचीं चाकेंच अकस्मात निखळलीं होतीं. जगण्याचा एकमेव मार्ग एकदम बंद झाला होता. घरांतले सारे व पोस्टातले निम्मे पैसे संपले होते. सारे चाळीस रुपये शिल्लकींत होते. मुहूर्त जवळ येत चालले होते, अन् अक्काच्या लग्नाची खटपट करणे निकडीचें होतें. तिला सतरावें सरलें होतें, अन् ती नुसतीच घरीं बसली होती. दादाला मोठया हौसेने व मोठ्या धीराने कॉलेजांत घातलें. पण ह्या टर्मची फीची वेळ जवळ आली होती. उमाची लुगडीं फाटलीं होतीं. तिला दिवस गेले आहेत अशी धास्ती होती. स्वतःची प्रकृतीहि एकदा...गरजाना अंत नव्हता. कसें सारें सांवरायचें. कुठवर रेटायचें ? नोकरी तर नाहींशी झालेली. दुसरी मिळेल अशी अंधुक आशाहि नाही...

मन्याचे मन भूतकाळात वावरत होतें. आपल्या बेकारीचा बाऊ त्याला वाटत नव्हता. खेड्यांत काढलेलें आयुष्य त्याला आठवत होतें. घरचें जेवण,

विहिरींतलें पोहणें, मित्राच्या मैफली ! तें सारें दूर सारून त्याला शहरात नौकरीसाठीं यावें लागलें. वर्षभर केलेल्या हमालीत त्याचें मन कधींच रमलें नाहीं. काकाच्या धाकानें व नानांनी साभाळून घेतलें म्हणून तो टिकला. पण आतां सुटला तरी परत पूर्वायुष्याकडे जाणें अशक्य होतें. घरच्या अडचणीसाठीं ह्याच यंत्रांत भरडणें भाग होतें. नानाच्या वाटेनें नाइलाजानें जाणें नशिबीं होते......

गिरणीचा भोंगा ऐकतांच दोघेही भानावर आले. बारा वाजले. आपापलीं मनें आवरून दोघानीं एकमेकाकडे पाहून क्षीण हास्य केलें. नानांनीं कोट काढला व ते वारा घेऊ लागले. मन्या फेऱ्या घालूं लागला. मधून मधून दोघेहि चुळबुळत, चोरून एकमेकांकडे पहात होते. मग अखेर नाना म्हणाले,

"तुला जेवायचें नाहीं का ?—उपास का काढतोस ! ह्या डब्यातलें तरी खा—"

लोचटपणा लपवून मन्यानें टेबलावरच्या डब्यावर झडप घातली. नाना उठले व पलंगावर पसरले. रात्रभर त्यांना धड झोप नव्हती. काळजीनें खंगल्यासारखें वाटत होतें. मन्या उठल्यावर आपण केव्हां पलंगावर विसावा घेतों असें त्याना झालें होतें. हाताची घडी करून त्यानीं डोळे मिटले व सर्व विचार विसरून शात पडून रहायचें ठरवलें !

दीड पोळी, माठाची भाजी, मोहरीचें लोणचें—मन्यानें डबा चकचकीत साफ केला, पुन्हां बांधून ठेवला. अर्धी उरलेली डी लक्स फुंकीत तो कादंबरी वाचू लागला. आज आठवडाभर नानाच्या डब्यात त्याचें दोन्ही वेळचें जेवण होत असे व जुन्या कादंबऱ्या वाचण्यांत वेळ जात असे. खानावळींतल्या राईसप्लेटपेक्षां नानाचा घरचा डबा अर्धामुर्धा असला तरी चवदार वाटे. अन् रोजच्या भकास आयुष्यापेक्षां पुस्तकातलें वेगडी जीवन अधिक आकर्षक भासे.

कादंबरीचीं पानेच संपलीं म्हणून मन्या भानावर आला. गहिऱ्या ग्रामीण कथानकांतून शहरांतल्या यंत्रात सांपडला. भोंवतीं रखरखीत दुपार भरली होती. सारें मरगळलेलें. वेळहि वेळेवर जात नव्हती. मन्याला

वेड्यासारखे झालें. काम नाहीं, धंदा नाहीं, घरदार दूर राहिलें, हा वनवास वाट्याला आला......

तेवढ्यात त्याच्या ध्यानांत आलें कीं नाना झोपेंत कण्हत आहेत. मन्याला चमत्कारिक वाटूं लागले. नानाचे काय होणार? त्यांच्या घरच्या लोकाचें काय होणार? घरच्या लोकाना लपवून नाना नोकरीवर जाण्याचा बहाणा किती दिवस करणार?—नोकरी गेली म्हणजे काहीं चोरी केली नाहीं कुणाची! घरीं का कळवत नाहींत ते? त्याना कुणाचें भय आहे?— आपल्याला आईची, काकाची दहशत आहे. पण नानाना......

नानाचे कण्हणे सरेना. मन्या आवेगाने उठला व नानाना हालवून हाका मारूं लागला.

नाना जागे झाले व 'यस सर' म्हणून उठून बसले. समोर मन्या दिसताच ते शरमून गेले. भोंवतालचे वातावरण पाहतांच त्यांना ब्रह्माड आठवले. त्याना वाटलें होतें कीं आपण ऑफिसातच आहोत. एकामागून एक ड्राफ्ट्स खरडत आहोत. तांबड्या शाईनी शेरे लिहीत आहोंत. अन् बढती देण्यासाठी साहेबाचे बोलावणें आले आहे .....

नाना पलंगावरून उठले व फेऱ्या घालूं लागले. काय करायचें, काय करायचे! त्याचे मन भकास झालें. अर्ज, वशिला, विनंत्या—काहींच मार्ग दिसत नव्हता. उद्या काय करायचे?—एक तारखेला पगार कुठला आणायचा?—घरच्या लोकाना तोंड कसे दाखवायचें?—हा एक खाड्री तंबू उभा कसा ठेवायचा?—

नानांच्या मनांतली घालमेल मन्याला जाणवत होती. त्याला ती तळमळ पाहवेना. तो उद्‌गारला,

"नाना, तुम्ही घरीं जा!—हा दुहेरी कोंडमारा कशाला सहन करतां!— घरीं कळलें तर घरचे लोक उलट धीर तरी देतील—"

नाना त्याच्याकडे पाहून शुष्क हंसले. अन् म्हणाले,

"का रे बुवा!—मला कटाळलास का—"

"असं काय बोलता!—उलट..."

मन्या मध्येच गप्प झाला. त्याच्या डोळ्यांत पाणी प्रकटलें. पण परिस्थितीच्या भीषणतेनें तो एकदम पेटून गेला. तो आवेशानें म्हणाला.

" नाहीं तर असेच ऑफिसांत चला माझ्याबरोबर ! हातात स्वेटर घेऊन साहेबाला विचारतों, नोकरी देतोस की नाहीं !–काय खायचं आम्ही ?–कसं जगायचं ?–"

हंसण्याऐवजीं नाना त्याच्याकडे वेडयासारखे पाहूं लागले. कुठला कोण मित्राचा पुतण्या ! असे जीव जवळ आहेत म्हणून जीव देणें अशक्य होतें मात्र—

नकळत नाना खुर्चीवर बसले. मन्या पलंगावर टेकला. दोघेहि विचार करीत होते. अन् डोक्यातले विचार दूरहि सारीत होते.

मग केव्हांतरी नाना म्हणाले,

" किती वाजले रे—"

" असतील तीन साडेतीन—"

" घडयाळ काय झालं ?—"

मन्या कांहींच बोलला नाहीं. नाना टेबलावर घडयाळ शोधूं लागले. कादंबऱ्या, कवितांचीं पुस्तकें, सिनेमाची जुनीं तिकिटें, नटीचा फोटो... नानांनीं मन्याकडे निरखून पाहिलें. दादापेक्षां दोनतीन वर्षांनींच मोठा होता. पण शिक्षण सोडून जगाच्या धकाधकींत मिसळावे लागलें होतें बिचाऱ्याला. गाल बसत चालले होते, डोळ्यांत प्रौढत्व सांचत होतें....

नाना मृदुपणानें म्हणाले,

" मनोहर, मला म्हणतोस ! पण तुझं काय ? तूं कां जात नाहींस परत ? तूं तरी का उपासमार करतो आहेस आपली ? काका रागावतील व आई रडेल एवढेच ना ?—कांहीं नाहीं. नोकरी मिळेपर्यंत घरीं राहूनच—"

" कां ? तुम्हांला कंटाळा आला माझा ?—"

मन्या नानांची नक्कल करीत हंसला. पण नाटक रंगलें नाहीं. नानांचीं वाक्यें व मन्याचें हसणें ह्यांनीं वातावरणाला अधिकच भकास आकार आला.

अंमळशानें नाना म्हणाले,

" वेळ कसा जाणार सहापर्यंत ?—जरा भटकून येऊं. चलतोस ?—"

मन्यानें कुलूप उचलले. टेबलावरचीं नाणीं खिशांत टाकलीं. नानांनीं कोट घातला व दोघेहि खोली लावून बाहेर पडले. न बोलतां पाय नेतील तिकडे ते जाऊं लागले. तीन वाजले होते. अर्धी उन्हें उरलीं होतीं. रस्त्यातून फेरीवाले ओरडत होते. घराच्या खिडक्या-दारातून एकाद दुसरी स्त्री दिसत होती. पुरुष मंडळी ऑफिसात गेलेली होती. रणांगणावरून रजेवर आलेल्या सैनिकाना शहरात हिंडतांना जसें वेगळें वाटतें, तसें नाना नि मन्याला वाटत होतें....

नाना एकाएकीं थबकले. फिरत फिरत ते कुठच्या कुठें आले होते. समोरच शाळेची इमारत होती. शाळा सुटली होती नि मुलें दाराशीं उभ्या असलेल्या चिक्की नि भेळवाल्याभोंवतीं घोंघावत होतीं.—अन् मधू तेथेंच एका बाजूला बोट तोंडात अडकवून उभा होता !—

मधूला पहाताच नानाना भय वाटलें. मधूने आपल्याला अशा वेळेला पाहिलें तर—नानांनीं मन्याच्या दडाला धरलें व तोंड फिरवून ते दुसऱ्या रस्त्याला लागले. हळुहळू त्याच्या मनांतली धडधड आटोपली व आपल्या मुलाला भ्यावें लागलें ह्या दैवदुर्विलासाचें दुःख दाटूं लागलें.

बाजूला एक होटेल दिसलें, अन् मन्या थबकला. कांहींतरी करायचें म्हणून त्याला चहा घ्यावासा वाटला. नानांना तो म्हणाला,

“ चहा घेऊं !–ऑफिसांत साडेतीन झाले कीं तुम्ही माझ्याकडून चहा उकळत होतांत—”

मन्याचे मागोमाग नाना दुकानांत शिरले. चहाची आठवण अनेकवार आली होती, पण ती उसळी त्यांनीं दडपली होती. खिशात दमडीहि नव्हती. मन्यानें म्हटल्यावर त्याना आनंद झाला. अन् मन्याची उरलेली चिल्लर आपण खर्च करणार ह्याची शरमही वाटली.

सिंगल सिंगल चहा दोघांनींहि ढोसला. दुकानांत दोन टांगेवाले, तीनचार गिरणी मजूर व एक पट्टेवाला चहा पीत होते. नाना म्हणाले,

“ हे लोक खरे सुखी ! पैसे असले कीं नबाब, पैसे नसले कीं संन्यासी ! —अन् नोकरी गेली तर छपन्न नोकऱ्या चालून येतात त्यांना. स्वतःच्या कष्टाचे—”

" सर्वांत सुखी ऑफिसचे पट्टेवाले. मला ऑफिसांत हेडक्लार्कपेक्षा पट्टेवाल्याचाच हेवा वाटे. फायली फिरवाव्यात, सलाम करावेत, झाले काम ! स्टुलावर डुलक्या घ्यायच्या, तपकीर ओढायची अन् चिरीमिरी उकळायची. हें खरं गंमतीचं आयुष्य—"

पट्टेवाला व टांगेवाला उठून गेला. नानांनीं वर्तमानपत्रावरून आंधळी नजर फिरवली. मन्या भिंतीवरील उत्तान चित्राकडे [illegible] पाहूं लागला. मग दोघेहि उठले. मन्यानें दोन आणे दिले. नान[illegible] मान घालून पुढें सटकले.

रस्ता संपला होता त्याबाजूला नवी वसाहत सुरू झाली होती. एका अवाढव्य अर्धवट बांधलेल्या इमारतीशीं दोघेहि आले. दमल्यामुळें ते[illegible] दगडावर बसले.

नाना म्हणाले, " कसलं तरी सरकारी ऑफिस होणारसं दिसतंय इथें—'

मन्याला नानांची गम्मत वाटली. कचेऱ्यांशिवाय त्यांना सुचत नव्हतें दुसरें. धंदेशिक्षणाच्या शाळेची जागा होती ती. तरुणाना मोफत धंदेशिक्षण देण्याची कुणाची तरी योजना तिथे साकार होत होती. वशिला नव्हता नाहींतर मन्या तिथेंच येणार होता. अन् नानांना तिथें सरकारी ऑफिस दिसत होतें. कदाचित् तिथें स्वतः हेडक्लार्क झालों आहोंत असेंहि दिसत असावें. मन्या गप्प बसला. आपण इथें येऊन शिकत आहोंत अशीं स्वप्नें रंगवूं लागला.

तेवढ्यांत एका मोठ्या मोटारींतून दोन जाडजूड इसम उतरले नि शेजारीं बांधल्या जाणाऱ्या बंगलीकडे निघाले. त्यांतल्या एकानें नानांना पाहून रुंद हास्य केलें, नि म्हटलें,

" हॅलो नाना ! काय करतोस रे इथ ?—"

नानांनीं चांचरत अर्धवट उत्तर दिलें. त्या इसमानें तें धड ऐकलेंहि नाहीं. जातां जातां तो म्हणाला,

" तो बघ, माझा नवा बंगला. मी नुकताच बांधला. ये ना एकदां पाहायला—"

नाना नुसते हंसले. तो गृहस्थ गेला तरी त्या दिशेकडे पाहात राहिले. अन् मग एकाएकीं मन्याला म्हणाले,

" हा माझा वर्गबंधू !—काळ्याबाजारात गब्बर झालाय. बंगले बाधतो नि लगेच विकतो. गडगंज कमावलयन् ! नशिबवान् आहे !—चल बाबा, जाऊ या आतां. उशीर झाला.

मन्या उत्तरायला [illegible] म्हणता. त्या बंगलींत राहणाऱ्या पोरीवर प्रेम करायला त्यानं [illegible] सुरवात केली होती. नानाच्या मार्फत ओळख निघेल हें ध्यानांत येतांच तो खुलला. त्याला वाटलें, नानाना म्हणावें, चला बघूं तरी बंगला !—पण त्याला परिस्थितीची जाणीव झाली. नानांच्या नि [illegible]च्याहि ! बेकारानें बंगल्यातल्या बाहुलीवर कसें प्रेम करायचे ?

उन्हे आवरलीं होतीं. मंद वारा सुटत होता. रस्ते फुलत होते. मन्या व नाना झपझप चालूं लागले. नानाचे मन पुन्हा घिरट्या घालूं लागलें. डब्रा सायकलवर टाकून घरीं जायचे. कामामुळे दमल्याचा आव आणायचा. वाट पाहणाऱ्या पत्नीकडे पाहून हास्य करायचे. मोकळेपणीं मुलाच्यांत मिसळायचें. उद्या सकाळीं परत घराबाहेर पडेपर्यंत हें सोंग सजवायचें. पुन्हा उद्या संध्याकाळीं—किती दिवस असें ढकलायचें ? त्यापेक्षा घरींच जाऊं नये—

मन्याला खोलीवर परतायचें भय वाटत होतें. नाना गेल्यावर काय करायचें !—मित्रात कसें मिसळायचे ? जो तो पैसे पदरीं ठेऊन, जो तो आपापल्या आयुष्यांत गुंगलेला ! कुणी कॉलेजांत, कुणी नवविवाहित, कुणी नोकरीधंद्यांत—एकट्यानें खोलींत बसून कसा वेळ काढायचा ?—आई, भाऊ भोंवतीं असते तर तेवढाच विरंगुळा वाटला असता—

खोलीच्या दाराशीं मन्याचा मित्र भेटला. घड्याळ अन् अंगठी विकल्याचे एकशेंवीस रुपये त्यानें मन्याला दिले.

खोलींत आल्यावर मन्या नानाना म्हणाला,

" हे घ्या एकशेंदहा रुपये ! ह्या महिन्याचा पगार !—पगार उशीरा मिळेल म्हणून घरीं थाप मारलीत. किती दिवस चालणार ती ?—हे घ्या !—दहा मला पुरतील महिनाभर ! "

नानांच्या डोळ्यांतून खळखळ पाणी आलें.

मन्याला घसा गोठल्यामुळे बोलता येईना. तो नोटा नीट लावत खालीं मान घालून उभा राहिला.

नानांनीं डोळे कोरडे केले. मन आंवरून ते म्हणाले,

" किती मोठ्या मनाचा आहेस मनोहर! माझ्यासाठीं घड्याळ नि अंगठी फुंकलीस!—ते पैसे परत कर नि डाग परत आण! वेड्या, विकण्याच्या का वस्तू असतात त्या?—अन् माझ्या फाटलेल्या आभाळला तूं कुठवर ठिगळ लावणार?—"

मनोहर मान वर करून रडव्या स्वरांत म्हणाला,

" मग तुम्हीं घरीं सारं सांगून टाका!—तुमचे हे हाल मला पाहावत नाहींत. बेकारीपेक्षां हें नोकरीचें सोंग तुम्हाला पोखरून टाकील—"

" अरे वेड्या, सगळंच पोखरलं आहे. मी एकटा भोगतों तें पुरे कीं!—तूं नाहीं का घरीं खोटीं पत्र पाठवत?—"

" माझी गोष्ट निराळी. मी तरुण आहें. मला..."

" म्हणूनच म्हाताऱ्याचा अवतार आणूं नको—थांब, असं करूं. मीच तुझ्या काकांना युक्तीनें लिहितों सार. अन् मग दोन चार दिवसानीं तूं जा घरीं. मी इकडे खटपट करीन तुझ्यासाठीं. नोकरी मिळाली कीं ये..."

मन्या वेड्यासारखा हंसला. नानांनीं कळवलें कीं काका ऐकतील. घरीं जाता येईल. जरा मजा मारता येईल काहीं दिवस तरी—

पण तो एकाएकीं नानांचा हात धरून म्हणाला,

" अन् मी गेल्यावर तुम्ही दिवसभर काय कराल? कुठें हिंडाल? अन् नाना, तुम्हाला ताप आलाय! अंग कढत लागतंय तुमचं! छत्, मी आजच जातों तुमच्या घरीं—"

नाना नाइलाजानें खुर्चीवर बसले. कसेबसे म्हणाले,

" साग बाबा! आत्तांच जा. मला नाहीं झेपायचा हा खेळ! पण जरा युक्तीनें सांग हं. मी येतों मागाहून. तुझ्या काकांसाठीं पत्र पुरें करून येतों. तूं जा. अन् हे पैसे परत कर आधीं—"

नानांनीं थरथरत मन्याच्या हातांत नोटा कोंबल्या. मन्यानें दुसऱ्या

हातांत डबा घेतला. अन् खालीं पाहणाऱ्या नानांकडे न पाहतां तो खोलीबाहेर पडला.

मन्या गेल्यावर नानाना रडूं कोसळलें. घरांत सुतकी वातावरण पसरणार, घरांतला मोकळा आनंद उडून जाणार ! नानाना थंडी वाजून आली. पलंगावर पडावें असें वाटलें. मन्याच्या मागोमाग धावावें असें वाटलें, पण त्याना कांहींच करवेना. अन् मन्याच्या काकाना खुबीचे पत्र लिहायचे होतं...

काय लिहिणार कपाळ !—' तुमच्या पुतण्याची नौकरी गेली. दुसरी नक्की मिळेलच. पण तोवर इकडे राहणें खर्चाचें व त्रासाचें. म्हणून त्याला तिकडे बोलावून घ्या. मी खटपटींत आहेच.'—नानांना कर्दनकाळ काका समोर दिसूं लागले. अन् मन्या बेकार झाल्याचें कळलें कीं त्याच्या आईला पुन्हां पोळपाट–लाटणें घेऊन घरोघर हिंडावें लागणार !—कसें कळवायचें? काय थाप मारायची ?—

नानांनीं अनेक कागद नासले. खोटें नाटें लिहिणें खुबीनें युक्तीनें त्यांना अगदीं जमेना. अखेर नाईलाजानें ते नुसते बसून राहिले.

मग मन्या आला.

नाना धडपडत उभे राहिले. घरीं काय झालें असेल ह्याची त्यांना कल्पना होतीच. तरीपण ते वेडयासारखे व्याकुळ होऊन मन्याकडे पाहूं लागले.

मन्या म्हणाला,

" मी घरीं गेलों तेव्हां दारात दादा दिसला. कॉलेजमधले त्याचे मित्र जमले होते नि गॅदरिंगला नाटक कुठले बसवावें ह्याची चर्चा चालली होती. सुमित्रेची गाण्याची तार लागली होती. मधू नि बेबी खेळत होतीं. कमळाक्का सांजवात लावीत होत्या. काकू मला पाहतांच पुढें आल्या. मी बोलायच्या आंत म्हणाल्या, ' उशीर होणार हें सांगायला आलांत ना ?—हेडक्लार्कची मर्जी असणं हा तोटाच म्हणायचा. नि बढती मिळायची म्हणून हेही काम करीत राहतात—' मी डबा पुढें केला नि परतलों. काकूंच्या प्रसन्न चेहऱ्याकडे नि मुलाच्या मोकळ्या खेळण्याकडे पाहून मला धीरच होईना..."

● ● ●

अरविंद गोखले

याचे कथासंग्रह

—*—

१ नजराणा

२ जन्मखुणा

३ उन्मेष

४ तनुजा

५ माहेर

—*—